# दीप

( कथासंग्रह )



संग्राहक,
वि. भा. पाठक.
( परभणी )



जून १९४०

किंमत ०-८-०

## "दीपं दर्शयामि"–

मराठवाड्याचें सांस्कृतिक जीवन विकसित करणाऱ्या महाराष्ट्रशारदेची यथासांग पूजा बांधण्याचें राहो, निदान " दीपं दर्शयामि " म्हणावयाचें भाग्य तरी लाभावें हीच आंतरिक इच्छा आहे !

सात वर्षांपासून हस्तलिखित रूपानें केलेल्या साहित्यसेवेची आठवण म्हणून हा मुद्रित " दीप " महाराष्ट्रशारदेच्या चरणीं अर्पण करीत आहे.

प्रस्तुत कथासंग्रहास प्रातिनिधिक स्वरूप आलें नसलें तरी यावरुन मराठवाड्यांतील कथावाङ्मयाची कल्पना येऊन रसिकांचें समाधान होईल असा आत्मविश्वास वाटतो.

लेखक, प्रकाशक आणि माझ्या सहकाऱ्यांनीं केलेल्या अमूल्य सहाय्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं !

' दीप ' कार्यालय } —वि. भा. पाठक

# प्रकाशकाचे दोन शब्द !

मराठवाड्यांतील वाङ्मय इतर ठिकाणच्या वाङ्मयाशीं तुलना करतां कोणत्याही प्रकारें कमी प्रतीचें नाहीं. तरी पण प्रकाशन संस्थेच्या अभावामुळें योग्य तें स्थान त्यास प्राप्त होऊं शकलें नाहीं. ही खेद जनक परीस्थीति अंशतः तरी नाहीशीं करावी या हेतूनें प्रकाशन कार्य आम्ही हातीं घेतले आहे.

प्रथमतःच श्री. वि. भा. पाठक यांनी संग्रहित केलेला लघु-कथासंग्रह "दीप" प्रकाशित करण्यास दिला या बद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहो.

आनन्दसागर प्रिंटिंग प्रेस आणि विशेषतः तेथील कलावान कंपोझीटर श्रीयुत शं. का. शेलगांवकर यांचे ऋणी आहोत.

शेवटीं प्रकाशन कार्य असेंच पुढें चालू राहणें जनतेच्या साह्यावर अवलंबून आहे. जनता माझा उत्साह वर्धित करीलच अशी आशा बाळगणारा—

ता. १५-६-४० } एल्. के. कुळकर्णी,
प्रकाशक

**कथाः—**

दगड आणि देव.

भिवा.

पऱ्यांचा खेळ.

रितं अंतःकरण.

बुवा !

ईद !

कुमद.

पहिलें प्रेम.

गुन्हेगार.

खारा आड.

पाचोळा.

जग कुठं चाललं आहे ?

**लेखकः—**

श्री. भालचंद्र कहाळेकर बी. ए.
,, एम्. रघुनाथ एम्. ए.
,, वसंत शहाणे.
,, ए. बी. पाठक बी. ए.
,, पैठणकर.
सौ. सुशीलाबाई फाटक एम्. ए.
,, बी. चौधरी.
,, ब. म. पानसरे.
,, ग. ना. अंबेकर.
,, बालशंकर देशपांडे.
,, वि. भा. पाठक.
,, —बी. रघुनाथ.

## दगड आणि देव

: लेखक :
श्री. भालचंद्र कहाळेकर

नदी वहात होती...
काठावर मारुतीची मूर्ति होती !
मूर्तीला लोक नेहमीं शेंदूर लावीत. पूजा करीत.
कुण्या एका गृहस्थानें उरलेला शेंदूर जवळच्या दगडाला फासला !
जनतेला वाटलं हाही एक देवच आहे !

* * *

" घणाचे घांव सोसावे, तेधवां देवपण पावे. "
दगडाला वाटें खोटें आहे हें !—
" मी नाहीं कां देव झालों, मी कधी घांव सोसले ? "

* * *

क्वचित् देवपण विनायासें मिळतेंही, अन् जातेंही तसेंच !—
कारण तो केवळ बाह्यवेष असतो.
अंतःकरणापर्यंत देवत्व भिडलेलें नसतें !

* * *

## द्वीप

नदीला पूर आला—
मारुतीची मूर्ति आणि दगड दोन्ही ही प्रवाहांत सापडले!
खरी कसोटीची वेळ होती ती !—
दैवानें लाभलेलें देवपण कर्मानें, त्यागानें टिकविणें हेंच खरें देवत्व.

*  ×  *

पूर ओसरला—
पुरांत ज्याचें देवपण राहिलें त्यालाच लोक देव मानूं लागले !

×  *  *

दगड !
हो, आतां त्याचा शेंदूर गेला होता ना !—
म्हणूं लागला,
" घणाचे घाव सोसावे, तेव्हां देवपण पावें ! "



# भिवा

: लेखक :
**श्री. एम्. रघुनाथ** एम्. ए.

हैद्राबादेंतील उस्मानिया हॉस्पिटलमध्यें मी अकौंट्स क्लार्क होतों. हैद्राबादचें हें हॉस्पिटल म्हणजे सबंध हिंदुस्थानांत नांवाजण्यासारखें आहे. तें सर्व प्रकारच्या अद्ययावत् उपकरणांनीं व निरनिराळ्या शाखांतील तज्ञ, युरोपीय, पदवीधर डॉक्टरांनीं भरलेलें होतें. या हॉस्पिटलाला मुख्य प्रवेशद्वार जरी एकच होतें तरी डॉक्टर्सना व इतर अधिकाऱ्यांना जाण्यासाठीं लहान लहान अशीं आणखीहि फाटकें होतीं. अशाच फाटकावर भिवा नांवाचा म्हातारा शिपाई चौकीदार म्हणून नोकर होता.

सर्व शिपायांप्रमाणें या म्हाताऱ्यासही बारा रुपये पगार असे. याचें काम एवढेंच कीं अधिकारी वर्गाशिवाय इतरांस तेथून आंत येऊं द्यावयाचें नाहीं. भिवा हा साठ-एक वर्षांचा म्हातारा असून मोठा इमानदार आणि आज्ञाधारक माणूस असावा असें वाटे. परंतु अधिकारी जाण्याच्या फाटकानें साधारण माणसाला अडी-अडचणीच्या वेळीं चिरीमिरी घेऊन सोडणें वगैरे गोष्टी त्याच्या नित्याच्या सरावांतल्या होत्या ! त्याच्या या गैरवर्तनाबद्दल त्याला धमकावलें तर वाटेल ती शपथ घेऊन तो या गोष्टीचा साफ इन्कार करी.

एके दिवशीं एक कागद घेऊन तो मजकडे आला. येतांना तो लंगडत

होता. चेहऱ्यावरून जेवढा केविलवाणेपणा व्यक्त करणें शक्य होतें तेवढा व्यक्त करीत त्यानें आपली कहाणी निवेदन केली.

" मला तीन आठवड्यांची रजा पाहिजे, साहेब. "

" अरे, तुला इतकी रजा कशी मिळेल ! तुझें तर येथें चोवीस तास काम असतें; शिवाय पगारहि नाहीं मिळणार या दिवसांचा. "

" साहेब, गरिबावर दया करणें आपल्या हातीं आहे. माझी स्थिति पाहा. मी रजा घेतली नसती, कांहीं कारण नसतें तर. हा पाहिलात माझा पाय ? मला नारू झाला आहे. आठ दिवस त्याची ठणक सहन करीत आहे, पण आतां शक्य नाहीं. आमच्या कंदकुर्तीला जाऊन इलाज करवून येतों "

" मूर्खा, एवढ्या मोठ्या हॉस्पिटलमध्यें राहतोस व औषधाचा इलाज करण्यासाठीं तुझ्या खेड्याला जातोस ? लोक हंसतील आणि बडा डॉक्टर तुला या कारणानें रजा तरी देईल का ? "

" छे ! छे ! साहेब या तुमच्या बड्या दवाखान्यांतील औषधें आमच्यासारख्या गरिबांच्या कामाला येत नाहींत. मी पडलों मोंगलाई पुराणा माणूस. मला ही नवीं इंग्रजी औषधें काय व्हावींत ? आम्हाला त्यांचा काय गुण येणार? परवा त्या रामलिंगम् म्हाताऱ्याला प्लेग टोंचला आणि पंधरा दिवसांच्या आंत त्याचा मुडदा पडला. मी टोंचून घेतलें नाहीं तर पाहा कसा तगडा आहे ! आमच्या गांवीं एक म्हातारा न्हावी आहे. असा उत्तम इलाज करतो नारूवरती. एक औषध बताशयांत देतो. विषासारखें कडू असतें. काय करावें, घ्यावें लागतें. पण नारू मात्र बियाला राहत नाहीं. "

भिवाचा अर्ज व म्हणणें मोठ्या डॉक्टर साहेबाला सांगितलें. डॉक्टरसाहेब मोठे हुषार, आपल्या विषयांत पारंगत आणि ध्येयवादी होते. मानव जातीचीं दुःखें हलकीं करण्याचा आपण प्रयत्न करीत आहोंत असा त्यांचा अभिमान होता. त्यांचा अभिमान त्यांच्याच ठिकाणीं जिरला. त्यांनीं भिवाला बोलावून समजावण्याचा प्रयत्न केला. ते म्हणाले, " तुला उपचार करतों, तूं बरा हो आणि मग त्या कंदकुर्तीच्या न्हाव्याला भेटून गांवीं जाऊन ये. त्याला सांग,

तुझ्या औषधावांचून नारू बरा झाला. "

भिवानें अगदीं काकुळतीला येऊन विनंति केली, " साहेब, रजा देतां येत नसेल तर देऊं नका. पण आपलें औषध माझ्यावर लादण्याची शिक्षा करूं नका. तुमच्या पायां पडतों ! "



# पत्त्यांचा खेळ !

: लेखक :
**श्री. वसंत शहाणे.**

बाहेर चांदणं अगदीं टिपूर पडलं आहे. चतुर्थीचा चंद्रच तो. सकाळचे पांच झाले असावेत. अंथरुणावरचा रग सारून नुकताच मी बाहेर बागेंत चांदण्याची शोभा पाहायला आलों होतों. सकाळचा सुखद शीतल वायु अन् शीतल प्रकाशानं न्हाऊमाखूं घातलेली सृष्टि ! वर आकाशांत तारे चमकत होते, तर खालीं नवोदित सुगंधी फुलांनीं झाडं बहरलेलीं होतीं ! वर स्वर्ग होता नि मी खालीं स्वर्गसुख अनुभवत होतो ! मी कवि असतों तर...

मनोविहाराच्या हत्तीवरून मी खालीं उतरलों तों बागेच्या पलीकडच्या बाजूस त्या छोट्या बंगलीजवळ कसलीशीं पान सळसळ वाजलीं ! झाडांच्या आळ्यांना पाणी देण्यांत येत होतें अन् त्या प्रवाहाचा मंजूळ असा खळखळ आवाज होत होता. स्वर्गसंगीताच्या अनुरोधानं मी चालूं लागलों. पारिजातकाच्या झाडाला हालवून कुणी फुलं गोळा करीत होतं. ती स्त्री होती. झाडाआडून तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडं बघण्याचा मोह कां कुणास ठाऊक पण मला आवरतां आला नाहीं ! साधीसुधी वेषभूषा अन् असामान्य सौंदर्य कुठं लपून राहतं कां ?

तिच्या शुभ्र पातळाची किंचित् निळी किनार नितंबापासून टांचेपर्यंत रुळत होती. आणि विपुल केशसंभारामुळं मानेपर्यंत आलेल्या तिच्या गेंदवाज अंबाड्याजवळच्या दोन्ही कर्णाग्रांचा गौरवर्ण खुलून दिमत होता. उभं राहून ळावर परिजातकाच्या झाडाला ती हालवत होती. अन् तिच्या शुभ्र पातळावर देखील फुलांचा सडा पडत होता. चांदण्यानं न्हाऊमाखूं घातलेल्या पिठामारख्या शुभ्र सृष्टीवर वरच्या ताऱ्यांनीं सडा घातला होता ! नि--

अंबाड्यावर पडलेली तीं फुलं हाताच्या ओंजळीनं काढीत ती स्त्री खुदकन् हंसला !

चतुर्थीच्या चंद्रानं सरोवरांतळीं चंद्रविकासी कमळं फुलायची कधीं राहिली आहेत कां ? अर्थशास्त्राचा विद्यार्थी मी ! पण मला देखील हास्य फुटलं ! मागं न पहातांच मानेला गोडसा झटका देत ती म्हणाली,

" आतां गट्टी फूऽऽऽ... "

सतराव्या शतकांत तुकारामानं आपल्या बायकोला हातानं गोड घास घातला म्हणे ! अन् मी तर विसाव्या शतकांत कॉलेज जीवनाची मजा चाखत होतों, क्षणभर ईस्टरच्या सुटीमुळं जयंत देशपांड्याकडं मुंबईहून मी आलों होतों हें मी अजिबात विसरून गेलों. अन् अगदीं नकळत काव्यतंद्रींत मी बोलून गेलों

" तर मग गट्टी कोणाशीं ?... "

तिनं एकदम चमकून मागं वळून पाहिलं !

हरिणं सुंदर असतात ! गोड असतात ! पण माणसाजवळ एकदम येणं त्यांना बरं वाटतं कां ?

झाडाआड लपलेल्या मला पाहतांच " अगबाई ! " असा उद्गार काढून फुलांची दुरडी तशीच टाकून हरणाप्रमाणं ती फाटकाकडं पळाली. हरणं कुठं सांपडत असतात कां ? पण रामचंद्राप्रमाणं मला...पण किती निराळ्या अर्थानं!

माझ्या हृदयाला गुदगुल्या झाल्या...मनोहर स्वप्न किती आल्हादकारक असतं ! बाहेर रस्त्यावर कुणीं गाणं म्हणत चाललं होतं...

" मनकी आशा मनमें रही... "

-मी भानावर आलों. दुपारी देखील माझ्या मनांत तेंच गाणं घोळत होतं.

अशांतच जयंताची थाप पाठीवर पडली व आम्हीं फिरायला निघालों.

" हें रावबहादुरांचं सुंदरभुवन " जयंत माहिती देत होता, " तें बघ राव-बहादुरच येताहेत. " मी समोर पाहिलं. तो एक जाडाजुडा निमगोरा, अंगांत पर्शीयन कोट घातलेला म्हातारा येत होता. जवळ आल्यानंतर त्यांना जयंतानें माझी ओळख करून दिली.

मी दुसरें दिवशीं मुंबईला परत जाणार हें पाहून रावबहादुर हंसत म्हणाले, " ठीक ! आमच्या शकूला ठाण्यापर्यंत चांगलीच सोबत आहे. अन् खेरीज ठाण्याहून मुंबईपर्यंत रंगूलासुद्धां. "

ही रंगू कोण?...दुसऱ्या दिवसापर्यंत माझ्या हृदयाला गोड गुदगुल्या होत होत्या. आम्हीं स्टेशनवर गेलों. जयंत सारखा गाडी सुटावयाची वेळ झाली तरी माझ्याशीं बोलत उभा होता. रा. ब. परस्पर स्टेशनवर येणार होते. माझं लक्ष सारखं प्लॅटफॉर्मकडं लागलं होतं.

चेहऱ्यावर देवीचे वण असलेली, काळशाकुट्ट रंगाची, घामानं किन्वकट दिसत असलेली अन् कपाळावरच्या जाड्या टिळयानं बावळट दिसणारी एक स्थूलदेही बाई येत होती. गुलाबाचं फूल तोडायला जावं तों कांटा—!

" आंत बैस " रा. ब. म्हणाले. मी दिङ्मूढ झालों. नंतर माझ्याकडे वळून ते म्हणतात, " संभाळून न्या हो आमच्या शकुंतलेला ! "

नांव सोनूबाई पण—... " मुंबईला असतां वाटतं ? " अघळपघळ हंसून तिनं विचारलं. उत्तर देणं भागच होतं. मी म्हणालों " होय ! "

" मग आमच्या रंगूला बरी सोबत आहे ठाण्यापासनं " ती म्हणाली. माझ्या मनांत रंगूविषयीं अधिकाधिक कुतुहल जागृत होऊं लागले. अन् कां कोण जाणे, सकाळचं स्वप्न मला पुनःपुन्हां दिसूं लागलं.

तेवढ्यांत ठाण्याचं स्टेशन आलं. समोर पहातों तों सकाळीं मनाला हुरहुर लावून गेलेली स्वप्नांतली ती मोहक मूर्तीच डब्याकडं येत आहे असं मला वाटलं. माझं हृत्कमल फुलून गेलं ! कारण तें फुलवायला सूर्य येत होता !

किंचित् अधिक् धिटाई आली होती माझ्या अंगीं. तिजजवळ एक इंग्रजी पुस्तक होतं. त्याचं नांव " Human Happiness "

बाहेर वृत्तपत्रविक्री पोरं ओरडत होतीं " जर्मनीनं नॉर्वे घेतला ! " मला अत्यंत आश्चर्य वाटलं. परंतु, रंगूनं मला साद्यंत राजकीय परिस्थिति समजावून सांगितली. मी म्हटलं " दांडगा व्यासंग आहे हं तुमचा राजकारणाचा. " " छे छे ! " ती म्हणाली. मी म्हटलं " सुंदर माणसाला आत्मस्तुती प्रिय नसते म्हणे ! "

" तर तर ! " ती म्हणाली.

मी म्हटलं " दर आठवड्यास मला आढावात्मक परिस्थिति समजावून सांगा ना ? " अन् अखेर मी तिचा होकार मिळविला.

त्या दिवसापासून नियमित ती हिंदुकॉलनीकडं दादरला येत होती. जयंताच्या बागेंत पाहिलेलं तें रम्य स्वप्न...जणूं निष्पर्ण लतेला बहर आला नि सुंदर कलिका...माझं हृत्कमल खरंखुरं फुलून गेलं ! तो दिवस...

दिवेलागणी होऊन अंधार पडला तरी त्यादिवशीं आम्हीं चौपाटीवरून परत फिरलों नव्हतों. दिवाळी जवळ येत चालल्यामुळं उजवीकडं वाळकेश्वराच्या बंगल्यांत रोषनाईची तयारी होत होती. शेंकडो विजेचे दिवे लागत होते. त्यांचा प्रकाश नि आमच्या हृदय-एकीकरणाचा प्रकाश ! आख्खी मुंबई आम्हाला प्रकाशित झाल्यासारखी दिसत होती.

" रंगू ! " रुद्ध कंठानं मी म्हणालों.

" पद्माकर !... " तिनं प्रेमयुक्त दृष्टीनं मजकडं पाहात म्हटलं. झालें ! दोन अंतःकरणं एक झालीं !

" रंगू ! तूं माझी होणार ना ? " मी तिचा हात हातांत घेतला. तिनें मुळींच प्रतिकार केला नाहीं. तो क्षण आमच्या आयुष्यांतील वचनपूर्तीचा द्योतक होता. शीतल वायूंत उंच भराऱ्या घेत आम्हीं घराकडें परतलों.

अन् रावबहादुरांची--आपल्या काकांची--संमति मिळवून घ्यावयाचं तिनं कबूल केलं होतं ! अन्—

कुठंसं माडीवरच्या कोनाडेवजा खिडकींत आपलीं पिलं दृष्टीस न पडल्यामुळं कळवळून त्या पिलाच्या आईनं काढलेला आर्तस्वर मला ऐकूं आला.

* * *

'चित्रे'च्या अंकांत आलेला माझा लेख नुकताच मी वाचत पहुडलों होतों. सुखवस्तु पित्याला पुत्ररत्न झाल्यामुळं आनंद होतोच! नाहीं कां?... आणि आज तर लतिका--रंगूचं नांव देखील मी ठरवून टाकलं होतं--रावबहादुरांच्या अनुमताचं शुभवर्तमान सांगायला येणार होती. अन् खेरीज माझ्या बी. ए. च्या परिक्षेचा निकालहि पण होता! पेपर्स चांगले गेले होते. अन् त्या दिवसाला आमच्या भावी आयुष्याच्या आणाभाकांपेक्षां खास अधिक महत्त्व होतं. परिक्षेच्या निकालापेक्षां लतिकेच्या बातमीसंबंधानं कितीतरी अधिक औत्सुक्य होतं. चार वाजावयाची मी चातकासारखी वाट पहात होतों. लतिकेकरितां तिच्या आवडीचं लिंबाचं सरबत कशारितीनं करावं याचा मी विचार करीत होतों. तों काय आश्चर्य!

तीनाचा अलार्म नि लतिकेचं आगमन एकाएकीं झालं!

"तीन वाजतांच कसा उगवला या सूर्य आज?" तिला हंसविण्याच्या उद्देशानं मी म्हटलं. पण—

तीन वाजतां कधीं सूर्य उगवेल कां? उलट तो मावळायच्या पंथाला लागायचा! लतिकेची कळी कोमेजलेली दिसली. तिच्या गालावरचा गुलाबी रंग नष्ट झाला होता. मृगजळामागें धांवणाऱ्या तहानेल्या प्रवाशाला खडक दिसावा तसं झालं मला. माझं हृदय धडधडूं लागलं. मी कळवळून विचारलं.

"लते! काय झालं सांग ना!"

ती स्तब्ध झाली. तिची मान खालीं झाली होती. अगदीं न राहवून मी म्हटलं "सांग! लते सांग! तुझं माझ्यावरचं प्रेम नाहीसं होण्यासारखी गोष्ट घडली कां? बोल! लवकर बोल!..."

तसंच खालीं पहात तिनं नकारार्थी मान हालविली. मी तिचा हात हातांत घ्यावयाचा प्रयत्न करूं लागलों. पण तिनं आपला हात जोरानं सोडवून घेतला अन्—

ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. एरव्हीं कडाक्यानं वाद माजविणारी सभाधीट लतिका एकाएकीं रडूं लागते हें पाहून मला आश्चर्य वाटलं. पण—

"पद्माकर! विसरून जा आतां या लतिकेला!"

" म्हणजे ? " मी आश्चर्यानं उद्गारलों.

" प्रेम आंधळं असतं. त्याला गरीबी श्रीमंती, लहान थोर, रंकराव असले दिखाऊ मात्र दिसत नाहींत. तें निर्भेळ असतं, निष्काम असतं !..."

तिचे पुढचे शब्द तिला आलेल्या हुंदक्यांतच विरले. तिच्या काकांनीं तिची पसंती धिःकारून लावली होती हें स्पष्ट होतें. माझं डोकं सुन्न होऊन गेलं ! सर्व वस्तू मला भयाण वाटूं लागल्या. " ही आठवण ठेवा हं ! " असं म्हणून धडाधड ती पायऱ्या उतरून खालीं गेली.

कुडींतला आला नष्ट झाल्यासारखं झालं मला. मी समोर पाहिलं तो एक पत्त्यांचा डाव होता. पत्त्यांचा डाव !

त्या डावाशीं लहानपणच्या माझ्या कितीतरी आठवणी संलग्न होत्या. ' पांच–तीन–दोन ' खेळतांना पांचाची वेळ आल्यावर आपला हुकूम सांगायला मिळतो, अन् दुसऱ्याच्या राजाराण्या आपल्या दुरीतिरीनं मारतां येतात. अन् दोनाच्या वेळीं—

कितीवेळ मी त्या तंद्रींत तसाच उभा राहिलों असतों कुणास ठाऊक ? पण पाठीवर कुणाशीची थाप बसली म्हणून मागं वळून पहातों तों जयंत उभा!

" पद्मा ! लेका, झोंप घेतोहेस कीं काय ? फर्स्टक्लास गांठलास ! **Hearty Congrats** ! चलो !..."

गाईच्या स्तनाला दूध नसलं तरी वासरूं सोडतं कां ? जिन्यावर सारखा पाऊलांचा धाडधाड आवाज होऊं लागला.

" पेढे काढा ! " " अभिनंदनास्पद ! " इत्यादि नियमित प्रकारांनीं माझी खोली भरून गेली.

उसन्या हंसतमुख चेहऱ्यानं मी त्यांचं स्वागत केलं. चहा चिवड्यावर ताव मारीत भावे म्हणाला—

" अरे पद्माकर, तुझ्याबरोबर मि. शाळीग्राम अन् मि. पाध्यांचं अभिनंदन करणं अवश्य आहे. "

माझी मुद्रा प्रश्नार्थक झाली.

" अरे, घरजांवई होणार आतां ते रावबहादुरांचे. " पाठीमागून कुणीसं ओरडलं.

" म्हणजे ? " मी आश्चर्यानं प्रश्न केला.

" अरे पद्मा, " मध्येंच भावे म्हणाला, " शकुंतला या सिनेमाशोकीन सुप्रसिद्ध गायक मि. पाध्ये आणि रंगू कुलकर्णी या वेदाभ्यासजड शाळिग्राम-शास्त्र्यासाठीं ! "

" नांवावरून तर जुळलं बाबा ! " शास्त्र्याला कुणीसं चिडविलं !

मला काय होतहोतं तें समजत नव्हतं ! नमस्कार करून मित्रमंडळीं केव्हां गेली तें देखील मला पुरतं समजलं नाहीं ! फराळांच्या बशा, चहाचे कप, केळींच्या सालीं...सर्वच अस्ताव्यस्त पसरलं होतं. गुलाबाच्या फुलांच्या आयुष्यांत प्रथमच मला कांटा मोडला होता. मी स्वतःला फार दुःखी समजत होतों.

दुसरें दिवशीं सकाळीं तीन पाकीटं पोस्टमननं आणून दिलीं. एक शास्त्र्यांच्या नि रंगूच्या लग्नाची पत्रिका; दुसरी पाध्ये न् शकुंतलेच्या लग्नाची पत्रिका. पाध्ये ! किती आनंदी, खेळकर अन् विनोदी अन् शकुंतला...नांव सोनूबाई अन् हातीं कथलाचा वाळा !...

तिसरं पत्र उलगडून मी वाचूं लागलों.

" प्रिय पद्माकर,

'प्रिय' म्हटलं म्हणून रागवाल ? प्रिय माणूस कधीं अशी 'वंचना' करील कां असं तुम्हाला वाटत असेल. पण पद्माकर ! शरीरान मी कुठल्याशा भटाला जरी बांधलेलें असलें तरी मनानं तुमचीच आहे. पद्मा !...तुम्हांला अशी गोड हांक मारायचं मी ठरवलं होतं. अन् तुमची लतिका...ती आतां सुकून गेली, बाजारी आयुष्यांत जळून खाक झाली. लतेला सुंदर फुलं येणार असं तुम्हांला मनापासून वाटत होतं, नाहीं ? पण काकांच्या आसुरी अभिमानाला मी बळी पडलें. शकीला त्यांनीं कुठलासा फॅशनेबल मुलगा पाहिला म्हणून आनंदानं ती उड्या मारीत. सुखी होवो बिचारी ! पण मी... निर्जन, ओसाड वनांत सांपडलें आहे, तहानेनं घसा सुकून गेला आहे. पण पद्मा, अमृतानं तहान भागविणारे...मजपासून अगदीं दूरदूर आहते. उद्यां मी बोहल्यावर चढेन, पण मनांतून साररुया माझ्या देवाच्या चिंतनानं...

अश्रुनं आतांच डोळे डबडबून येत आहेत. किती लिहूं अन् काय लिहूं हें मला समजत नाहीं. माझा पत्त्यांचा डाव ! जपून ठेवाल ना ? तुम्हीं म्हणाल ही असली कसली भेट ? पण—आपण त्या दिवशीं डाव खेळत होतों ना ? माझे एक्केराजे तुमच्या हुकुमाच्या दुर्गतिरीला बळी जात होते. अन्... आज, तुमची लतिका देखील अशाच हुकमी डावाला बळी जात आहे. आम्हीं अबला बलवान् केव्हां होणार आहोंत ते एकटा परमेश्वरच जाणें ! आज तर त्यांची आहुति पडत आहे. हुकमी दुरीतिरीला ह्या राण्या बळी पडत आहेत. खरोखर स्त्रियांचं आयुष्य पत्त्यांच्या खेळासारखं आहे !

"पद्मा" म्हणून एकदां शेवटची गोड हांक मारूं कां ?

मनानं सर्वदा तुमचीच
पण
शरीरानंही तुमची होऊं इच्छिणारी
"**लतिका**"



# रितं अंतःकरण : :

: लेखक :
श्री. ए. बी. पाठक बी. ए.

असा बोलभांडपणा बायकांच्या जातीला शोभत नाहीं !

हो ! आहे मी बोलभांड ! आहे मी बडबडी ! लोकं बोलूं लागले म्हणजे मी काय गप बसायचं ! नाहीं, पण सुंदराताईना काय करायचंय माझ्याशीं. चांगलं उतार वय झालय कशाला पाहिजे नष्टापष्टा.

म्हणे ' सावित्रीकाकू ! आहे ही तुमच्या जीवावर धोंड ! '

ही कां मला जेऊं खाऊं घालते. स्वतःच्या पायाखालीं काय जळतं तें नाहीं पहायचं. बायकांच्या जातीला परपुरुषाबरोबर नाटकाला जाणं शोभतं वाटतं ? पण अशांच्या तोंडी लागलं कीं आहेच आपलं आईचं, दृष्टि आड सृष्टि !

पण मी म्हणते माझीच कां सृष्टि यांच्या डोळ्यांत भरते.

विधवांना कां जीव नाहीं कीं हौस नाहीं कीं कांहीं नाहीं ?

सर्व कांहीं करावसं वाटतं पण—

तसंच परवा—

चारु ! चारु !! अशा आईच्या जोराच्या हांकेसरशीं मी खालीं आले.

' म्हटलं आतां वाचन पुरे. दादाशास्त्री फराळाला यायचे आहेत तेव्हां स्वयंपाकाला लाग. '

‘ अग आज फराळाचं काय म्हणून ? ’

‘ अग एकतर त्यांना तुझ्या हातचं चालायचं नाहीं नि आज शिवाय वैकुंठ चतुर्दशी. चांगली असतीस तर नाहीं कां जातां आलं असतं आंवळीला. पण नाहींच आपल्या नशिबीं त्याला काय करायचं. बरं हं ! मी जाऊन येतें तोंवर काशीताईकडे ’ असं म्हणून आई बाहेर पडली.

चांगली असती तर ! मी वाईट कां आहे ?

दादाशास्त्री आले. जवळे नि जातां जातां ‘ सावित्रीकाकू मला वाटतं तुम्ही नाशकाला जाणं चांगलं ’ असं तंबाखूची चिमूट तोंडांत टाकतां टाकतां ओकून गेले.

त्यावर आई नुसती हंसली.

मी आडून ऐकतच होते सारं. अस्सा राग आला कीं नाहीं ! जणूं केसांतच पाप न करूं देण्याचं सामर्थ्य भरून राहिलय. यांच्या भावजयीनं नव्हते कां केस काढले? पण म्हणतात ना ‘ घरची नाहीं धाकांत नि बाहेरची कां पदर घेईना. ’ या कर्ममार्तंडांना लोकांच्या घरच्या उठाठेवीच भारी ! सहज दुपारीं चंद्रिका मासिक चाळीत होतें. तों पहिल्याच पानांवर ‘ कुरंगनयना ’ ही कवि किशोर यांची कविता. कविता पहातांच त्या दिवशीची आठवण झाली मला.

अशोच बागेच्या फाटकाशी दादांच्या ‘ कुरंगेशी ’ खेळत होतें मी. कुरंगेच्या पाठीवर डावा हात सोडून तिच्या तोंडांशीं तोंड लावून बसलें होतें. स्थीरउ डोळ्यानं मान वळवून माझ्याकडे कुरंगा पहात होती. जणूं काय तूं नि मी सारखेंच आहोंत असं भासवावयाचं होतं तिला. किती केवीलवाणी नजर ती. त्या नजरेंत पारतंत्र्याचं मूर्तीमंत चित्र भरलेलं होतं. मी कांहींशी कुरंगेच्या नजरेशीं नजर लावून तर कांहींशी फाटकाकडे डोळे लावून पहात होतें. इतक्यांत किशोर पांढऱ्याशुभ्र धोतराचा सोगा डाव्या खिशांत कोंबलेला व हातांत फरकॅप घेत कांहींसं गुणगुणतच झपाझप पावलें टाकीत आले. मला पहातांच ते थबकले. त्यांच्या एका चप्पलचा वाळूवर आवाजही झाला.

ते हंसले !

मीही हंसलें ! 

हें दृश्य चटकन् माझ्या मनःचक्षुसमोर आलं ! त्यांच्या काव्य प्रतिभेच्या विलासाचं कौतुक करावसं वाटलं अन् आनंदही झाला; कीं त्यांच्या काव्य प्रतिभेला चालना देण्यास कारणीभूत झालें मी. अन् खरं सांगूं ? प्रेम की काय म्हणून म्हणतात ना तेंही पण वाटलं. असेन मी सुंदर ! त्यांच्या डोळयांत भरत असेन ! पण आपली आवडती वस्तू चारचौघांना कां दाखवत सुटायचं !

वाटलं कीं असंच अंक घेऊन किशोरकडें जावं. पण लोक !

लोक काय म्हणतील ! कोण पहात बसलं आहे मला ? पण पुन्हां मनांत आलं, जें आपल्या गांवींही नसतं ते लोकांच्या मनांत वसत असतं. लोकगंगेच्या वाहत्या पाण्याला कोणी थोपवायचं. बरं कुणी प्रयत्न केलाच तर अंगावर शिंतोडे उडण्याचाच संभव जास्त. मी कशाला दुसऱ्याचं उदाहरण घेऊं. किशोर कधींमधीं आमच्या घरीं येत. त्या पराचा लोकांनीं केवढा कावळा केला हें परवा मला कळून आलं.

वहिनी कायससं सांगत होत्या व त्यावर आम्हीं दोघीही हंसत होतो. इतक्यांत बाजूच्या कठड्यांतून See the butterfly of Kavi Kishore हे शद्ब आले. मी चमकून पाहलं. तो दोघेही चांगले सुशिक्षित दिसत होते. हा आमचा सुशिक्षित समाज !

एकंदरीत काय कीं आमच्या सारख्यांच्याकडं पाहण्याची समाजाची दृष्टीच बिघडली आहे. आई असो, बाप असो कीं भाऊ असो, जो तो उपदेशाचे चार शद्ब सांगायला तयार ! परवाच नाहीं कां आईनं सांगितलं कीं, 'चारु ! तूं आतां मोठी झालीस, हा थिल्लरपणा तुला शोभत नाहीं.' अशावेळीं वाटतं कीं कुठंतरी दूर अगदीं दूर निर्जन अरण्याच्या पलीकडें निघून जावं. नको यांचा सहवास ! स्वतःचा स्वतःलाच राग येऊं लागतो. मला आईचा असा राग आला कीं नाहीं ? पण करायचं काय ! सांगायचं कोणाला ! देवाला बोल लावले, दैवाला दोष दिला, रित्या अंतःकरणाचे कढ कुणाला सांगायचे ?

सूख !

हो सुखाकरितां मी हपापलें होते !

सुखाकरितां माझा जन्मच नाहीं !

कळी उमलायची, फुलायची नि सुकून जायची !

मी रडरड रडलें. मनानं मनाची समजूत पाडली. मी हंसले. किती विमनस्क हंसणं ते ! त्या हंसण्यांत सुखाचा लवलेश नव्हता, तर जळत्या जीवाची जाणीव होती. चारु ! चारु ! अशी हांक आली. मला वाटलं आई असेल, पण पुन्हां हांक आली तेव्हां उठलें, जरा केंस सांवरलें नि खालीं आलें.

मालनला पाहतांच माझ्या तोंडून ' किती दिवस झालें ग आपल्या भेटीला ' हें शब्द सहज निघून गेले.

' कित्ती म्हणजे ? परवां. परवां फार नाहीं कांहीं. ' असं मान वेळावून किंचित् हंसत मालन उद्गारली.

मी ओशाळलें.

' मला वाटतं आज हिचं डोकं ताळयावर नाहीं ' असं म्हणून प्रश्नात्मक मुद्रेनं मालननं आईकडं पाहिलं.

' नसायचचं ' तुच्छतेनं मानेला हिसका देत आई उद्गारली.

दैवाची साथ नसली म्हणजे घरचेसुद्धां परके होतात तर !

मालननं वहिनीला कुंकू लावलं !

मला !

देवाच्या घरीं माझ्या नांवें कुंकवाचा करंडा उपडा झाला आहे ना !

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणं मालनकडं गेले. लहानपणीं आमची दोघींची कित्ती गट्टी असायची. आम्हीं तऱ्हेतऱ्हेचे खेळ खेळायचें. सर्व कांहीं आठवलं ! मी जातांच जमलेल्या बायकांत कुजबुज सुरू झाली. मी कशाला तिकडे लक्ष देऊं. मी थोडीच त्यांच्याकरितां गेले होतें. मालन भेटली. ती नि मी तिच्या बागेंत जाऊन बसलों.

बागेंत गुलाबाच्या ताटव्याशेजारीं बसलों होतों. समोरच्या फांदीवर एक गेंद हंसत हंसत माझें भाग्य किती थोर म्हणुन खालच्या सुकलेल्या फुलाकडे

पहात होता. मालननं चटकन् तो तोडला नि मी नको नको म्हणत असतां माझ्या बुचड्यांत खोंवला.

वास्तवीक मालन मला तीन चार वर्षांनीं धाकटी. देवाच्या मनांत असतं तर नाहीं कां मी माझ्या तान्हुल्याला घेऊन आलें असतें. पण नाहींच तें माझ्या नशिबीं.

चांगलं आत मालनचं डोहळजेवण अन् माझ्या मनांत असलें अभद्र विचार.

मालन नि मी हातांत हात घालून मधल्या हॉलमध्यें आलों. तोच 'नांव चारुशिला पण—' हे शब्द कानीं आले. आम्हीं आल्यानं पुढील शब्द ओठाआड दडले असावेत.

जेवतांना मी विचार केला कीं, आपण थांबण्यांत अर्थ नाहीं. उगीच दुसऱ्याच्या आनंदांत आपल्या अशुभाचं विरजण कशाला घाला अन् शिवाय मला कोणी थांबण्याचा विशेष आग्रहही केला नाहीं. तेव्हां मी मालनचा निरोप घेऊन निघालेंच.

रस्त्यानं येतां येतां पावसानं मला गांठलं. आतां पांच मिनिटांत जाईल असं समजून बाजूच्या ओट्यावर आडोशाला उभी राहिलें मी. दोन एक मिनिटें झालीं असतील इतक्यांत सहज म्हणून किशोरनं खिडकीतून पाहिलं तों मी त्यांच्या दृष्टीस पडलें. बाहेर पाऊस धोंधों पडत होता. तुटलेल्या सरांतून जसे मोती पटापट खालीं पडावेत त्याप्रमाणें पाण्याचे थेंब जमिनीवर आदळत होतें.

किशोरनीं येण्याविषयीं मला हातांनीं खुणावलं पण परत खुणेनेंच त्यांना नकार दिला मी. लगेच ते हातांत छत्री घेऊन खालीं आले. मला ओट्या-वरून खालीं उतरण्याकरितां त्यांनीं एक हात पण पुढे केला. छे ! छे ! मीच उतरतें खालीं असं म्हणून मी खालीं उतरलें. पाऊस चालूच होता. त्यांनीं उजव्या हातांत छत्री धरली होती. एकाच छत्रींत पाऊस लागूं नये म्हणून आम्हीं अंग चोरून या कांठन्हे त्या कांठाला चालत गेलों.

इथं राहतां कां तुम्हीं ?

हो ! हो ! असं म्हणतच कोपऱ्यांत त्यांनीं छत्री ठेवली. खिडकींतून पाव-साचा देखावा मोठा नयनमनोहर दिसत होता. मधेंच मेघांचा गडगडाट व्हावा.

वरुणानं धरणीला म्हाणून काढायचाच जणूं निश्चय केला होता. तळपत्या विजांवर दृष्टी तरळत होती.

खोलींत पाय टाकतांच माझ्या मनाला किती प्रसन्नता वाटली. खोलीभर जाईजुईच्या फुलांचा सुगंध दरवळलेला होता. टेबलावर एकदोन पुस्तकें व व कितीतरी लहान मोठीं कागदाचीं चिटोरें दिसत होतीं. बाजुलाच एक छोटोशी वही पडली होती. त्यावर वळणदार अक्षरांनीं ' अश्रुंचीं फुलं ' हें नांव काढलेलं होतं. वरचं पान उलटतांच ! जिवलग जीवाच्या आठवणींतच सुखाची समाधी असते ! हें वाक्य लिहून पुढें अपसारण चिन्ह दिलं होतं. दुसऱ्या पानांवर ' हृदय शारदेस ' ही कविता दिसत होती. नांव पहातांच मी वर बघितलं तोंच किशोर म्हणाले ' जाऊं द्याना बोलून चालून कवीचं वाड तें. त्यांत विशेष तें काय आहे ? '

मी मनांत ' हृदय शारदेचा ' छडा लावण्यास सुरुवात केली. एकदां वाटे आपल्याला काय कराचंय. कांहीं कां असेना. पुन्हां वाटे विचारूं कां किशोरनां माझं मन हिंदोळ्यावर हेलकावत होतं. वाटलं किशोर माझ्याकडं भेदिक नजरेनं पहात आहेत. मी वर बघितलं तोंच किशोरनीं आपली नजर हातांतल्या सिगारेटकेसवर रोखली होती.

बाळूनं चहा आणला नि मग आम्हीं कितीतरी वेळ बसलों. पाऊस केव्हां थांबला हें समजलं देखील नाहीं. किती गोड बोलत होते ते !

थंड वाऱ्यानं माझं अंग शहारलं गोऱ्यापान दंडावर कांट्यांचीं पखरण झाली. तें पाहून ' पावसानं हवेंत किती गारठा आला आहे. ' असं किशोर उद्गारले.

' बराच वेळ झाला. आई काय म्हणेल ! जातें मी आतां. ' असं म्हणून मी उठलेंच.

' फारच गार वारा सुटला आहे नाहीं ? ' किशोरनीं विचारलं.

' हो '

' नि रस्त्यानं वाराही पण फार झोंबतोय ना ? '

' हो ' मी पुन्हां उत्तरलें.

' हा कोट घेतला तर नाहीं कां चालणार? असं म्हणून हंसत हंसत किशोरनीं खुर्चीवर टाकलेला ओव्हरकोट पुढं धरला. मला नाहीं म्हणतांच आलं नाहीं.

रस्त्यानं जातां जातां माझा मलाच कितीतरी आनंद झाल्यासारखा वाटला.

किती किती गोड आहेत किशोर!

मी टेबलवरचीं चार फुलं उचलतांच त्यांनीं मी नको नको म्हणत असतां हीं किती तरी फुलं दिलीं अन् म्हणतात काय ' घेऊन जा कीं सार्थकीं तरी लागतील. !

घरी येऊन पाहतें तो दादा घरीं चहा घेत होता नि आई कायसंसं सांगत होती.

मला पाहतांच दादानें हंसत हंसत पाट पुढं केला.

' हेंच तें. मी काय म्हणते इकडे लक्ष दे. बायकांच्या जातीला हें असं शोभत नाहीं. अशानं लोक बोलूं लागतात. ' अंगुलीनिर्देष करीत आई म्हणाली.

' अग पण आई जाऊं दे ना? चारु! तुझ्या भाऊजीचं पत्र आलं आहे.' असं म्हणून दादानं पत्र माझ्यापुढं धरलं.

'फारा दिसांनीं तुझ्या भाऊजीला प्रेमाचा पान्हा फुटलाय, पुढं तोच म्हणाला.

मी पत्र उलगडून वाचलं न वाचलंस केलं नि पुन्हां पाकिटांत ठेऊन दिलं.

' मग काय उत्तर द्यायचं ' दादानं माझ्याकडं व आईकडं पाहून विचारलं

आई कांहींच बोलली नाहीं.

मी पत्र घेऊन वर आलें.

आठ वर्षापूर्वीचं घर माझ्या डोळयापुढं आलं. एकेकाळीं त्याच घरांत माझं सुखसर्वस्व साठलेलं होतं. त्या घराची अधिष्ठात्री देवता होतें मी.

आज?

आज हक्काची मोलकरीण म्हणून त्याच घरांतली एकूण एक सजीव-निर्जीव वस्तू देखील माझ्याकडं पहात आहे असं वाटलं. काळाची वक्रगती किती कठोर आहे!

आज दादाला मी हवीशी आहे !

उद्यां !

उद्यां काय वाटेल !

आईनंही दुरूनदुरून मी जावं असं सुचवलं. आईला कां मुलीच्या कंटाळा यावा ? अखेर बरीच भवति न भवति होऊन सासरी सासरी तर आले मी. ज्या कामासाठीं मला मोठ्या प्रेमानं आणलं होतं तें जाऊबाईंचं बाळंतपणही झालं. नव्या नवलाईचे नऊ दिवस केव्हांच संपले.

आमच्या वन्सचं लग्न घाटत होतं. मला तरी काय माहीत ? एके दिवशीं घरीं पाहुणे आले. त्यांनीं वन्सला पाहण्याचा फार्स केला नि निघून गेले.

एके काळीं माझीही अशीच रंगीत तालीम झाली होती.

' बाई ! वन्सचा नवरा कवी आहे म्हणे ' कवी या शद्बावर जोर देत कांहींसं माझ्याकडं कांहींसं वन्सकडं पहात जाऊबाई उद्गारल्या.

' कवि हा प्राणी साऱ्या मुलूखाचा खट्याळ असतो बरं वन्सं ' मी म्हणालें.

' गुहेंतल्या सिंहिणीला आणि माहेरवासी पोरींना डिवचणं चांगलं नाहीं अं!' असं फणकाऱ्यानं म्हणतच वन्स उठून गेल्या.

झालं ! लग्न ठरलं ! लगीन घाई सुरू झाली.

घरांतल्या माणसांची तारांबळ उडूं लागली. पण काय असेल तें असो मला कशांतच आनंद वाटेना. कुणी हंसलें म्हणजे मीही हंसत असें इतकंच.

सकाळीं सातची वेळ. सूर्याची कोमल किरणं हेमदीप्तिनं चमकत होती. दारावर चौघडा झडत होता. वाड्यांत गोंगाट माजला होता. ब्राम्हणांनीं खड्या सुरांत मंगलाष्टकांना सुरुवात केली होती. मी माडीच्या सज्जांत कलती होऊन अक्षता टाकीत होतें. अक्षता टाकण्याकरितां वर उचललेला हात वरच्यावरच अधांतरी राहिला.

पाहतें तों कवि किशोर !...किशोर !!...किशोर !!!

उचंबळत्या भावनांचा आवेग कसा सहन करूं !

रित्या अंतःकरणाच्या ओलाव्याचा आसरा तो !



## बुवा !  :  :

: लेखक :
**कै. उ. ना. पैठणकर.**

—आणि खरें सांगावयायाचें म्हणजे तो खरोखरच एक साधू , सत्पुरुष होता... चेहऱ्यावर वार्धक्यामुळें बऱ्याच सुरकुत्या पडल्या होत्या. तरी पण तेजस्वी चेहरा होता त्याचा ! सर्वजण त्याला नमस्कार करण्याऐवजीं " जय सीताराम " म्हणीत. उलट तोही गंभीर आवाजांत " जय सीताराम " करी.

त्या देवळांत तो म्हणजे देवच होता एक...

जिकडे तिकडे उदबत्त्यांचा सुवास दरवळत असला तरी त्याच्या स्वभावाचा सुवास प्रत्येकाला प्रिय असे !...तो तेथें नाहीं असें कधींच घडलें नाहीं. दोन हात पंचा...लांब पांढरी दाढी...कपाळावर गुलाल—त्याच्या तेजांत व रुबाबांत भर घालीत होते.

देवळांतील देवांचें दर्शन न झालें तरी कबूल ! पण त्याचे दर्शन आम्हाला रोज घ्यावेंसें वाटें— हो आम्हाला ! जरी आम्हीं विसाव्या शतकांतलें तरुण मुलं होतों तरी...

एके दिवशीं सायंकाळीं मला आमच्या क्लबांत एकजण देखील दिसला नाहीं. एकदम माझ्या लक्षांत आलें कीं, आज सकाळीं डेंगळ्याला मुलगा झाल्याची तार आल्यामुळें हे बेटे त्याला ' बुडवायला ' गेले असतील !—

मी त्यांना कुठें म्हणून पाहात बसूं! छातीत मावेल तितका श्वास घेऊन मुस्कारा टाकला. आणि एकटांच देवळाकडे जावयास निघालों–

आंत पाहतो तों ही मंडळी आमच्या बुवाजींच्या जवळ जमलीं होतीं. काय झालें कांहीं कळेना. बुवाजी ध्यानस्थ बसले असावेतसें वाटलें. देवळांत एक प्रकारची भयानक उदासीनता आणि गंभीर वातावरण पसरलें होतें—

—ओळखीचेही कोणी दिसेना. माझ्या छातीतील धडधड आणि जिज्ञासा तेथें वाढणाऱ्या गर्दी बरोबर वाढत होती.

देवळांतील देवाच्या खोलीचे दरवाजे सताड उघडे होते. जणूं कोणी त्यांचे वैभव लुटून नेलें होतें! कुंड्यांतील फुलझाडांचीं फुलें आपोआप गळून पडलीं होतीं...समया मिणमिण तेवत होत्या!...

शेवटीं मी मोठें धाडस करून एकाला विचारलें—

"क्या बात हुई भाई?"

"आपको अभीतक मालूम नहीं?"

त्यानें आश्चर्यानें विचारलें. मी नकारार्थी मान हलविली.

"बुवाजी रामचरणमें विलीन हुये हैं!"

मला कसलासा धक्का बसला.

"बुवाजी रामचरणमें विलीन हुये हैं—" मी पुटपुटलों आणि खालीं मान घालून बाहेर पडलों—

अजून माझ्या डोळ्यासमोर तो गंभीर देखावा दिसत असून तीं अक्षरें "बुवाजी रामचरणमें" माझ्या कानांत घुमत असतात!



# ईद....!

: लेखिका :
सौ. सुशीलाबाई फाटक एम्. ए.

आज महिन्याची एकविसावी तारीख होती, व घरांत असलेल्या फक्त दोन रुपयांवरच लतीफला आपले व आपल्या कुटुंबाचे आणखी पंधरा दिवस काढावयाचे होते. त्याला भरूचा ॲन्ड सन्स कॉन्ट्रॅक्टर्सकडून मिळणारा अवघा तीस रुपये पगार त्याच्या हातांत पडतो न पडतो तोंच खर्च होई अन् मग पुनः पांच तारखेची वाट पाहत बसावयाचें एवढेंच त्याच्या हातीं राही !

" ईदला आतां फक्त दहाच दिवस राहिले," लतीफची पत्नी जरा काळजीच्या स्वरांत म्हणाली.

" हं " लतीफ उद्गारला व त्यानें गाढ झोपेंत असलेल्या रोशन व अहंमद यांजकडे पाहत सुस्कारा सोडला.

आज कितीतरी दिवसांपासून तीं दोघें ईदला नवीन कपडे घ्यावयाचे, खेळणीं आणावयाची, खाऊ खावयाचा वगैरे निरनिराळे बेत स्वतःशींच करून आपल्या पित्याला अगदी भंडावून सोडीत, व परिस्थितीचा झगझगीत प्रकाश डोळ्यापुढें असूनहि, असत्याच्या अंधराचा लतीफला अवलंब करावयास लावीत

" हो, हो; घेऊं बरं पुष्कळशीं खेळणीं अन् अगदीं झकास सण साजरा करूं...! " बाहेर अगदी उल्हासाचें, आशेचे शब्द तो बोले, पण मनांतील

काळजी व निराशा स्वतःशींच ठेवी.

" ईदपर्यंत पैशाची अगदीच सोय होणार नाही का? ह्या महिन्यांत कोठेच कसं दुसरं काम मिळालं नाहीं?" दोन महिन्यांच्या लहानग्या खलीफला झोळींतून काढीत फतिमा म्हणाली.

"पाहतों प्रयत्न करून. उसने मिळतील पण ऋण काढून सण साजरा करण्यांत आनंदापेक्षां दुःखच अधिक नाहीं का?" म्हाताऱ्या आईनें समोर आणून ठेवलेला नाश्ता संपवीत लतीफ ऊत्तरला.

दहा मिनिटें कोणी कांहीच बोललें नाही. सगळीकडे निस्तब्ध शांतता पसरली. थोड्याच वेळांत लतीफ ऊठला. खुंटीवरील मळकट व फाटकासाच कोट अंगांत चढवून त्याने टोपीखाली आपल्या केसांना व्यवस्थित बसविलें व सायकलवर स्वार होऊन तो निघाला.

रात्रीं अकरा वाजले होते. सकाळीं साडेसातलाच लॉरीच्या नोकरीवर गेलेला लतीफ अद्याप आला नव्हता. मुलें झोपी गेलीं होतीं व चुलीपुढे अन्न तसेंच ठेवून फतिमा पतीची मार्गप्रतीक्षा करीत दाराशींच बसलीं होती. प्रत्येक सायकलींची घंटी तिला लतीफची वाटून ती बाहेर डोकावी पण......? म्हातारीचा, खोकून खोकून जीव बेजार झाला होता. तरी अजून कसा आला नाही, काय झालं असावं वगैरे अर्धवट स्वताःलाच व अर्धवट सुनेला विचारून ती काळजी व्यक्त करीत होती.

अकरा वाजल्यानंतर जसाजसा जास्त वेळ जाऊं लागला तसतशी फतिमेच्या मनाची अस्वस्थता अधिकाधिक वाढूं लागली. काम झाल्यावर एक मिनिटही कोठे खोटी करण्याची लतीफला संवय नव्हती व तसाच उशीर व्हावयाचा असल्यास तो निरोप पाठवी. रात्रीच्या गंभीर शांततेंत क्लॉकटॉवरचे बाराचे ठोके अगदी स्पष्ट ऐकूं आले. म्हातारीला डुलकी लागत होती ती खडबडून उठली. लतीफचा अजूनहि पत्ता नव्हता. साडेबाराच्या सुमारास सिनेमाहून परत जाणाऱ्या लोकांच्या गडबडीनें एक दहा मिनिटेंच त्या भीषण शांततेचा भंग झाला असेल काय तो. पण पुनः सर्व निस्तब्ध! आता मात्र फतिमेच्या जिवाचा धीर सुटला व 'लॉरीला अपघात तर नसेलना झाला?'

असा तिच्या मनांत झटकन् विचार येऊन गेला. हो, ड्रायव्हराचें जीवित ! तिच्या न कळत हाताचीं बोटें कानशिलावर मोडलीं गेलीं व 'इडा पिडा टळो अमंगळ पळो' असे उद्गार मुखांतून निघाले.

वत्ती मिण मिण जळत होती. फतिमेनें दरवाजा लोटून घेतला व रोशन-च्याजवळच ती लवंडली.

"फतिमा, फतिमा" तिला अर्धवट झोपेंत, कोणी तरी हांक मारत अस-ल्यासारखें वाटलें, पण भास असेल म्हणून तिनें पुनः डोक्यावर चादर ओढली

आतां मात्र दारावरील ठक् ठक् आवाजानें व फतिमा म्हणून चांगल्याच मोठ्यानें मारलेल्या हांकेनें ती खडबडून जागी झाली व घाईघाईने उठून तिने दार उघडलें. पाहते तों लतीफ दारांत उभा ! कोण जाणे कां, पण त्याचे लालबुंद डोळे पाहून तिने घाबरून एक अस्पष्ट किंकाळी फोडली.

"फतिमा, फतिमा घाबरावयाला काय झालं ? मी लतीफ आहे. सर्जन-साहेबांच्या गाडीला ॲक्सिडेंट झाला म्हणून तिकडे गेलों होतों ८ वाजतां." तिला सांवरून घरांत नेत उशीराचें स्पष्टीकरण करीत लतीफ सांगू लागला.

त्याच्या शब्दानें व प्रेमळ स्पर्शानें फतिमा पुनः शुद्धीवर आली व तिनें बाहे-रचें दार लावून अडसर घातला.

"अगोदर कपडे काढून दोन घांस खायला चला पाहूं. सर्जनसाहेबांच्या अपघाताची हकीगत रोटी खातांना सावकाश सांगा." तिने चुलीपुढील डाळ रोटी एका थाळीत घातली व एका झांकणींत स्वतःसाठीं घेऊन लतीफला बसण्यासाठीं चटईचा तुकडा पसरला.

"ओळख पाहूं माझ्या हातांत काय आहे ?" चटईवर स्थानापन्न होत लतीफने आपली मूठ पुढें केली.

"मला नाहीं ओळखत...असेल कांहीं ! पण त्याची काय एवढी घाई ? जेवा अगोदर !"

परंतु स्वतःच्या आनंदाचा वांटा फतिमेला दिल्याखेरीज लतीफला रोटी कसली गोड लागते ? त्याने मूठ उघडली.

"काय नोट ?" फतिमेनें आश्चर्यानें विचारलें.

" होय ! सर्जनसाहेबांनीं घरीं येतांना हातावर ठेवली आजच्या कामगिरी-बद्दल. तुला काळजी होती ना ? अल्लाच्या मनांत असलं म्हणजे सर्व ठीक होतं ! अन् हें एवढंच नाही कांही, ईदपर्यंत आणखीही मिळेल. "

" खरंच ? " फतिमेला कमालीचा आनंद झाला...

" अगदी खरं ! पण एका अटीवर. मला यायला रोज इतका तरी उशीर होईल, तेव्हां काळजी करावयाची नाहीं माझं अन्न झांकून ठेऊन नेहमींप्रमाणें दहा वाजतां झोंपावयाचं...ह्याला कबुली असली तरच ह्या सात आठ दिव-सांत ईद साजरी करण्यास साधन मिळेल आपल्याला. "

" पण तें कां ?... " फतिमेला वाटलें रोज जागरण करण्यापेक्षां नकोच ते पैसे ! पण पुन्हां मुलांचा विचार तिच्या मनांत आला व लतिफच्या फाटक्या कोटाकडे तिची नजर गेली.

" सकाळीं आठ ते रात्रीं आठ कॉन्ट्रॅक्टरची नोकरी बजावून मला सर्जन साहेबांची गाडी दुरुस्त केली पाहिजे व तीही ईदच्या आधीं; कारण त्यांना लौकरच दौऱ्यावर जायचें आहे. "

" रजा नाहीं मिळणार दोन चार दिवसाची ? " आतांपर्यंत लतीफच्या मालकानें त्याला एकदाही रजा दिली नव्हती हें माहित असूनहि तिनें भीत-भीतच विचारलें.

" रजा ? अंह ! " लतीफ उपरोधिकपणें हंसला व म्हणाला " अन् रजा मिळून फायदा ? रोज एक रुपया दंड होणार ! "

फतिमेला त्याचं म्हणणें पटलें.

* * *

सर्जनसाहेबांच्या मोटार-दुरुस्तीचें काम त्यानें अगदी रात्रीचा दिवस करून संपविलें होतें. गेले दोन दिवस तर त्याला अर्धा तासमुद्धां झोप मिळाली नाहीं. आज नऊ वाजतांच तो घरीं आला. ' आब्बाजान आब्बाजान ' करीत मुलें त्याला बिलगलीं. फतिमेनें अभिमानानें त्याच्याकडे दृष्टिक्षेप टाकला.

" बेटा रोशन काय पाहिजे ईदला तुला ? "

" और अहंमद, तुम क्या चहाते हो ? " दोघांच्याही पाठीवर वात्सल्यानें हात फिरवीत लतीफने प्रश्न केला.

आठ दिवसांपूर्वीच्या काळजीनें कोठेंच पोबारा केला होता व आज सर्व घरभर आनंदाचें उत्साहाचें साम्राज्य पसरलें होतें.

नवीन नवीन बेत करण्यांत, ईद कशी साजरी करावयाची ह्यावर वादविवाद करण्यांत, कपडे काय करावयाचे ह्याचा विचार करण्यांत, खाना कसा संपला ह्याचें कुणालाच भान राहिलें नाहीं. लतीफला वाटत होतें सर्जनसाहेबांनीं दिलेल्या पंचवीस रुपयांत आपण इकडची पृथ्वी तिकडे करूं...आपल्या छो-ट्याशा जागेचें नंदनवन बनवूं ! फतिमेला छानशी ओढणी, अहंमदला सोनेरी टिकल्यांचा कोट असं कांहींना कांहीं प्रत्येकाला आणण्याचें त्याने ठरविलें.

दुःखाचे काय किंवा आनंदाचे काय विचार एकदा मनांत घोळूं लागले म्हणजे ते मनाचा अगदी पूर्ण कबजा घेतात व मग निद्रादेवीचासुद्धां पराजय होतो. लतीफचें व फतिमेचेंहि असेंच झालें. कल्पना-चित्रांनीं त्यांना आपला खेळ दाखविण्यास सुरुवात केली. आनंदमदिरेनें अम्मल बसविला व मग कितीतरी वेळ त्यांना अंथरुणांतच चुळबुळ करीत काढावा लागला.

* * *

ईदच्या आदल्या दिवशींची गोष्ट ! नित्याचे विधि उरकून लतीफ कामावर जायला निघाला.

" आज अगदी वेळांत वेळ काढून सामान आणा हं " म्हणत फतिमेने पंचवीस रुपये त्याच्या हातीं दिले. लतीफच्या प्रत्येक कृत्यांत आज घाई दिसत होती. नेहमी सावकाशपणें सर्व गोष्टी करणाऱ्या लतीफच्या हातून सायकल ठेवतां ठेवतां पडली, सिगारेट पेटवितां पेटवितां कोण जाणे कसा पण हातही भाजला ! एखाद्या गोष्टीची आपण जितकी घाई करायला जाऊं तितका अधिक वेळ लागतो.

त्यानें लॉरीचे चाक आपल्या हातीं घेतलें व स्विच ऑन करून हँडल मार-ण्यास तेथल्याच एका मजुरास सांगितलें. एक, दोन, तीनच काय पण दहा-बारा वेळां प्रयत्न करूनहि गाडी सुरू होईना. " क्या बेवकूब हो. " म्हणत

तो स्वतःच खाली उतरला. पण गाडी गिअरमध्यें होती. लतीफच्या लक्षांत ती गोष्ट येतांच अर्धमिनिटांतच त्याने गाडी न्यूट्रलमधें टाकून स्टार्टहि केली.

दुपारीं जेवण्यासाठीं म्हणून त्याला फक्त एकच तास सुट्टी मिळे. तेवढ्या वेळांत आज जेवण न करतां मार्केटमध्ये जाऊन सामानाची खरेदी करण्याचें त्यानें सकाळींच ठरविलें होतें. कॉंट्रॅक्टचें ठिकाणीं दगड लांकडें वगैरें सामान पोंहचवून तो परत येत होता. रीजंट सिनेमागृहाजवळ त्याची गाडी येते न येते तोंच पोलिसांच्या " फुर्र फुर्र फुर्र " शिट्या एकामागून एक ऐकूं आल्या. महाराजांच्या आगमनाची पूर्व सूचना होती ती ! लतीफ कांहीं नव्यानेच त्या शहरांत गाडी चालवीत नव्हता. त्याला पक्कें माहीत होतें कीं वीस पंचवीस वेळेस शिट्या झाल्याखेरीज तरी महाराजांची गाडी दृष्टिपथांत येत नाहीं. त्याला वाटलें आजहि तसेंच होईल. तेव्हां क्रॉसिंग ओलांडून भरदिशीं जायला कोणती हरकत ? डोक्यांत विचार व हातून कृति एकदमच घडली, व शिट्यांची परवा न करतां त्यानें तशीच गाडी दामटली. इतक्यांत महाराजांची रोल्सही उजव्या बाजूनें मोठ्या झपाट्यानें आली. एका क्षणाचा विलंब झाला असतां तर छानच टक्कर होत होती ! पण लतीफनें प्रसंगावधान राखून आपली लॉरी डाव्या बाजूस वळविली. रोल्स केव्हांच निघून गेली होती पण पोलीस आपल्या जागेवर नेहमींप्रमाणेंच उभा होता.

शिट्या ऐकूनहि गाडीं दामटण्याचें धाडस करणाऱ्यावर चालान झालें नसतें तरच नवल ! लतीफला गाडी थांबवावी लागली; दोन तीन पोलीसांनीं येऊन त्याला घेरलेंच !

" चलो चौकीपर, लायसन्स निकालो, क्या है तुमारा नंबर ? " प्रत्येकानें आपल्या अधिकाराची अम्मलबजावणी सुरू केली. त्यांना समजाविण्याचा लतीफनें पुष्कळ प्रयत्न केला, नेहमीचीं उदाहरणें दिली व शेवटीं अपघात तर होऊं दिला नाहीं म्हणूनहि सांगून पाहिलें, पण पोलिसांच्या पाषाण हृदयावर त्याचा परिणाम कसा होणार ? त्यांचें आपले एकच ब्रीद वाक्य—

" चौकीपर चलो '

लतीफ विनवण्या करून थकला. चालान म्हटल्याबरोबर त्याच्या पोटांत

घस्स झालें. पोलिसांची केस, किती दिवस लागणार त्याचा नेम नाहीं, अन् शिवाय महाराजांच्या गाडीशीं टक्कर करण्याचा आरोप! झालेंच! गिरफदार करून तुरुंगाची हवा खायला मिळण्याखेरीज दुसरी शक्यताच नव्हती! रोशन अहंमद, फतिमा सर्वजण जणूं कांहीं दुःखी व केविलवाणी मुद्रा करून समोर उभी आहेत असेंच त्याला वाटलें. त्याच्या भविष्यकालीन परिस्थितीचें भेसूर चित्र त्याला मनःचक्षुंपुढें दिसूं लागलें. त्याच्या काळजांत चर्रऽऽ होऊन अंग थरारलें!...त्याला कांहीं सुचेना. त्याची सद्सद्विवेकबुद्धी चूक झाली नाहीं असें साक्षी बजावीत होती, पण न्यायदेवतेचें व तिचें कधीं पटलें आहे? लतीफला असत्याची मनस्वी चीड होती. पण त्याचा अवलंब केल्याखेरीज आज त्याला गत्यंतर नव्हतें. सर्व भानगडींतून, त्रासांतून व कटकटींतून सुट-ण्यास एकच मार्ग होता व तो म्हणजे पोलिसांची मूठदाबी!! पुढील होणाऱ्या नुकसानाच्यापुढें सध्याच्या नुकसानाबद्दल लतीफला फिकीर वाटली नाहीं.

चौकीवर येतों म्हणून गाडी एका मजुराच्या स्वाधीन करून, पोलिसांच्या बरोबर लतीफ निघाला. दहा पंधरा हात गेल्यावर त्यानें दहा रुपयांची नोट काढून एकाच्या हातावर ठेवली, पण निष्ठुर पोलिसांचें तेवढ्यानें समाधान झालें नाहीं. एकवेळच्यां शराबलासुद्धां तेवढं पुरलं नसतं मग त्यांच्या इतर चैनींची काय वाट? मोठ्यांच्या अपराधाबद्दल तितक्या मोठ्या प्रमाणांतच दण्ड भर-ण्यास हवा!

" नहीं भाई इतनेमे क्या होता? हम तीन आदमी हैं. अब जितना है उतना सब दे देव. " जणुं कांहीं त्यांचीच सत्ता होती?

मुकाट्यानें आणखी पंधरा रुपये काढून लतीफनें त्यांची तृष्णा भागविली.

स्वतःचा प्राणच कोणी जबरदस्तीनें हिसकवीत असल्यासारखें लतीफला झालें...निढळाच्या घामानें मिळविलेले पैसे अन्याय पोसण्याच्या कामीं लागले.

" देखो, फिर नहीं ऐसा करना. " पोलिसांनीं जातांना मोठ्या दिमाखानें उपदेश करण्यास कमी केलें नाहीं. लतीफ जड अंतःकरणाने पूर्व ठिकाणीं आला व लॉरी सुरूं करून त्यानें मार्ग आक्रमिला.

* * *

## ईद...!

संध्याकाळीं साडेसात वाजल्यापासूनच रोशन व अहंमद यांची बाहेर येजा चालली होती. कोण उत्सुकतेनें अब्बाजानच्या आगमनाकडे त्यांचे डोळे लागले होते! उद्यां ईद म्हणून फतिमेनेंहि घर स्वच्छ करून जिकडे तिकडे झक्पक केलें होतें व उद्याची तयारी करण्यांत ती गुंतली होती.

लतीफ आज जरा उशीराच घरीं आला. त्याला दुरवर पाहतांच तो आल्याची वर्दी देण्यास दोघेहि बहीणभाऊ अम्माजानकडे धांवलीं. अगोदर कोण बातमी देतो ह्याचीं त्यांच्यांत शर्यतच लागली होती जणुं!

फतिमेने हातांतील काम तसेंच टाकलें व दमून भागून आलेल्या पतीच्या स्वागतार्थ तीं बाहेर आली. लतीफनें सायकलचा दिवा मालवला व अगदीं घरांत प्रवेश केला. त्याच्या खिन्न पण गंभीर मुद्रेवरून कांही तरी चमत्कारीक झालें असावें असा लगेच फतिमेने तर्क केला व हळूंच आंत जाऊन त्याला कांही विचारूं नका असें मुलांना बजाविलें.

लतीफनें कोट टोपी काढून खुंटीवर अडकवली व परसांत जाऊन स्वच्छ हात पाय धुतले. तो जेवावयास बसला खरा, पण एकही घांस त्याच्या घशा-खालीं उतरेना! घशांत आंवढा व डोळ्यांत अश्रु.

रात्रीं त्यानें फतिमेला सर्व वृत्तांत निवेदन केला.

"हरकत नाहीं, हरकत नाहीं..." फातिमा उद्गारली!



# कुमुद ! : :

: लेखक :
श्री. बी. चौधरी.

कुमुद आज येणार होती !

कुमुद आली त्या दिवशीं उपवनांत मोगरीला बहर आला होता. अन् जमिनीवर फुलांचा सडाच्या सडा पडला होता.

कुमुद आली त्या दिवशीं बकुळीच्या शाखेवर पाखरांची एक जोडी एक-मेकांस बिलगून बसली होती. त्यांनीं सुंदर गीतें गाइलीं आणि एकमेकांच्या चोंचीस स्पर्श केला.

कुमुदची आज ओझरती भेट ! उद्यां तिच्याशीं मनमोकळ्या गप्पा मारा-यच्या ! परवां तिला माझ्या सर्व कथा नि कविता दाखयच्या नि मग दूर कुठें तरी फिरायला जायचं !

आणखी एके दिवशीं...

मी कुमुदला भेटणार, कुमुद मला भेटणार. अन् पुऱ्या वर्षाची ताटातूट जोडली जाणार...माझे भाव संगितमय झाले. ' कुठुनि कसे आलों–आपली ही झाली भेट—"

कुमुदच्या घराच्या खिडकीचा पडदा फडफडूं लागला. माझ्या मनांत अनेक रम्य आंदोलनें उठूं लागलीं. दरवाज्याजवळ आलों, दरवाजा बंद होता. त्या

पायरीवर बसावसं वाटलं...बसलों नाहीं. आल्या पावली परतावसं वाटलं... परतलों नाहीं. रुद्ध कंठानं ' कुमुद ' म्हणून हांक मारण्याचा प्रयत्न केला... साधला नाहीं. थरथरल्या हातांनीं दार लोटण्याचा संकल्प केला...तो व्यर्थ झाला. मी स्वतःच्या लाजाळू स्वभावाचा शतशः धिक्कार करीत राहिलों.

आकाश आणि पृथ्वी जणूं तप्त वाटत होती. अन् निराशेनं झालेला अंतःकरणाचा दाह तर त्याहिपेक्षां भयंकर होता. मी घरीं परत आलों. कुमुदच्या भेटीची सकाळचि दारुण निराशा झाली होती. त्या निराशेत माझं डोकं तापलं. ग्लानि आली. अन् ग्लानींतच दोन प्रहरीं पडलों.

विमनस्क स्थितींत मी सुधेकडं गेलों तों—सुधेच्या खुर्चीवर कुमुद पाठमोरी दिसली. बालकासारखीं निष्पाप फुलासारखी खेलकर—एकाकाळीं तिच्या अंग प्रत्यंगातून प्रतीत होणाऱ्या सौंदर्याचे दर्शन घेण्यास दोन डोळे पुरत नव्हते.

पण आज...!

' कुमुद ' मी हांक मारली. तिनं पाठीमागं वळून पाहिलं. किती दचकलों मी. पांढरी फटफटीत दिसली मला ती. डोळे खोल गेले होते. किती सुकली होती कुमुद ! माझ्या डोळ्यांत आसवें उभीं ठाकली. पूर्वीची खेळकर, अल्लड दिसणारी कुमुद कुणीकडं ! अन् आज दिसणारी कुमुद कुणीकडं !...

दुसरेंच दिवशीं डॉक्टरच्या सल्यानं तिच्या वडीलाची परवानगी घेऊन माझ्याच घरीं औषधाची व्यवस्था केली होती. आठ दहा दिवसातच तिच्या प्रकृतीत आराम पडत गेला.

तों दिवस ! जन्मभर विसरणार नाहीं त्या दिवसाला. कुमुदची प्रकृती एकाएकी बिघडलीं होती. सकाळपासून सारखा बसून होतों तिच्या शेजारीं. डोळ्यापुढून गतायुष्याचे दिवस जात होते.

२१ जूनचा दिवस होता. हैद्राबादला शिकण्याकरतां निघालों होतों. गाडी सुटण्याच्या अर्धा मिनिट आधी कुमुद म्हणाली " निनाद लवकर येशीलना. नाहींतर—"

" कुमुद, जरूर येईन बरं ! तुझ्यासाठीं तरी..."

मी हैद्राबादला असतानाच इकडं तिचा विवाह जबरदस्तीनं एका बड्या

धेंडाशीं लावला गेला होता. नवऱ्याचं कधीं पटलं नाहीं तिच्याशीं. अँग्लो इंडियनची तरणी पोर नेहमीं त्यांच्याबरोबर असावयाची. कुमुदला तें सहन झालं नाहीं. तिच्या तक्रारीवर तिला उत्तर मिळालं–' घराचा रस्ता मोकळा आहे. ' कुमुदनं त्याच दिवशीं तें घर सोडलं अन् आज मला ती अशा अवस्थेंत दिसली.

" कुमुद, मला हांक मारलीस ? "

" निनाद अजून जागा आहेस ? "

" होय कुमा—! "

" निनाद ! मी काय केलं तुझ्यासाठीं ? "

" कुमा ! दिव्य प्रेम तूंच मला करायला शिकविलंस… "

सकाळीं मला एक स्वप्न पडूं लागलं. कुमा बरी झाली. कायदेशीर रितीनं तिनं घटस्फोट मिळविला. किती मजेंत दिवस जात होते आमचे. मी माझे लेख तिला वाचून दाखवावेत, अन् तिनं सुरेल आवाजांत गावं. दररोजचा हा कार्यक्रम ठरून गेला होता. दोन जिवाचं सुख तिसऱ्या जिवाशिवाय पूर्णतेला पोंचत नाहीं…एका वर्षानंतर घरांत पाळणा हलूं लागला….

ह्या मधूर स्वप्नांतून मी काय अर्थ घ्यावा ? सूर्याची किरणं घरावर पडूं लागली. जणूं आकाशलतेनं आपल्या पदरांतलीं फुललेलीं पुष्पं घेवून त्याची पखरण साऱ्या सृष्टीवर चालविलीं होतीं. बागेतल्या वेलीवर कळया फुलल्या होत्या. हें मनोहर दृश्य दाखविण्यासाठीं मी कुमुदला उठविण्यास तिच्या खोलींत पळत आलों—

" कुमा ! "

हात धरून उठवावं म्हणून मी तिचा हात धरला. तों काय ?—

किती थंड होता तो हात !

ती मला एकट्याला सृष्टीच्या या शृंगारलेल्या स्मशानांत सोडून गेली !…

रात्रीं एक नवीन तेजःपुंज तारा आकाशांत प्रकाशतांना दिसला. त्याकडं पाहून ' कुमुद ' अशी हांक घालण्याचा मोह मला आवरतां आला नाहीं.

---

# पहिलें प्रेम : :

: लेखक :
श्री. ब. म. पानसरे.

" स्वर्गाची तुझी काय कल्पना आहे? " असं जर तुम्हीं देवीदासला विचारलं तर तो चटकन् उत्तर देईल—" सह्याद्रीच्या एका लहानशा टेकडीच्या पायथ्याशीं वसलेलं आमचं कॉलेज ! " आणि मग तो आपल्या स्वर्गभूमीचं थोड्याशा विस्तारानं वर्णनही करील. तुम्हाला वेळ असेल तर उत्तमच! मग तो तुम्हांला आपल्या बरोबर त्या टेकडीवर फिरायला न्यायलाही कमी करणार नाहीं. आणि तिथं गेल्यावर तो तुम्हांला म्हणेल—

" मी तुम्हाला इथं कां आणलं माहित आहे ? इथून आमचा स्वर्ग तुम्हाला एका दृष्टीक्षेपांत पहायला मिळेल. किती सुंदर दिसतो आहे हा सगळा पसारा नाहीं ? ती आमच्या कॉलेजची मुख्य इमारत, तें थिएटर, ती लायब्ररी, तीं वसतीगृहें आणि तें आमचे क्लबस्. कॉलेजच्या खालच्या बाजूनं वाहणारा तो कालवा किती छान दिसतो आहे नाहीं ? स्वर्गांत तरी इमारतींची मांडणी इतकी तंत्रशुद्ध आणि व्यवस्थित असेलच याचा तरी काय नेम ? आणि सह्याद्रीच्या कडेपठारावरून वाहणारी ही खेळकर आणि खोडकर हवा आणि या खालच्या इमारतींतून दरवळणारं उन्मादकारी वातावरण जर स्वर्गांत असेल तरच स्वर्गाविषयीं मला कांहीं आपुलकी वाटेल. हो ! पण कांहीं इमारतींचा

उल्लेख करायचा राहूनच गेला. कालव्याच्या पलीकडे प्रोफेसरांचे बंगले आहेत आणि ते विद्यार्थिनींचं हॉस्टेल." अखेरच्या इमारतीचं नांव घेतांना तो किंचित् लाजत असे; पण हा सुक्ष्म फरक फक्त त्याला जाणणाऱ्या मित्रानांच माहीत होत असे.

टेकडी उतरतांना तो तुम्हाला म्हणेल—" स्वर्ग याहून काय भिन्न असणार आहे? आमच्या हैद्राबाद क्लबासारखांच तिथंही एखादा क्लब असेल! आणि स्वर्गांत अभ्यासाची काळजी नसेल हें खरं आहे; पण इथंसुद्धां आमच्या अभ्यासाविषयीं इथले प्रोफेसर कांहीं कमी बेफिकीर नाहींत! आणि याशिवाय इथं खेळले जाणारे हरतऱ्हेचे खेळ, यौवनाचा एवढा मोठा मेळावा आणि त्यामुळं उन्मादानं धुंद जहालेलं वातावरण कल्पनेच्या स्वर्गाखेरीज तुम्हाला फक्त इथंच पहायला मिळेल. मग सांगा मी म्हणतो तें बरोबर आहे कां नाहीं?"

पण एक गोष्ट मात्र तो सहसा कोणाजवळच बोलत नसे आणि ती म्हणजे त्याच्या स्वर्गातील अप्सरांविषयींची. त्या बाबतींत तो अगदीं मुग्ध असे. अगदीं निकटच्या मित्राजवळ तो कॉलेज-अप्सराविषयीं बोले. पण तें फक्त उसासे टाकण्या पुरतंच. स्वर्गात अप्सरांचा सहवास इतका सहज सुलभ असतांना आपली व एथील एका अप्सरेची, सुलभा-गुप्तेची नुसती ओळखसुद्धां या चार वर्षांच्या दीर्घकाळांत होऊं नये याचं शल्य त्याला राहून राहून टोचत असे. त्याच्या त्या स्वर्गसुखांत एवढंच काय तें गालबोट होतं; आणि लहान मुलं जसं आपल्या गालावरचं काजळ न समजतां आपल्या सर्व तोंडावर चोळून घेऊन तें काळं करतात, तसंच देवीदासनंहि आपलं गालबोट चोळून चोळून आपलं कॉलेजमधील निष्कलंक जीवन थोडसं बरबटून घेतलं होतं. आणि त्यामुळं तो कॉलेजच्या थोड्याशा मुलींत हास्याचा विषय झाला होता.

आतां हेंच पहाना. २ वाजून १० मिनिटं झालीं होतीं. आणि देवीदास यावेळेस नेहमींप्रमाणं कालव्यावरील पुलाला वळसा घालून कालव्यातील प्रवाहाच्या संथपणानं कॉलेजच्या दिशेनं येत होता. तो ही कृती अगदी सहज करीत आहे असं भासवीत होता. पण त्यामुळं कुणीच फसत नव्हतं. रोज नेमक्या याच वेळीं ४।५ मुलींचा एक मेळावा हंसत खिदळत याच रस्त्यानं

जात असे. आणि देवीदास त्या मेळाव्यातील एका पोरीला डोळे भरून आणि तोंड उघडं ठेवून पहात असे. त्या पोरींनां हें समजत असे आणि तें न समजल्यासारखं त्या दाखवीत असत. केव्हां केव्हां त्या पोरीची चेष्टाहि त्या करीत असत.

" सुभा, सांभाळून रहा बरं. तो तुला आपल्या नुसत्या डोळ्यांनीं मारून टाकील ! " एकजण म्हणे, त्यावर दुसरी विचारी—

" कोण ग हा ? "

" वा ! अग कोण म्हणून काय विचारतेस ? हा आमच्या सुलभाताईचा ' प्रिन्स चार्मिंग ! "

" अग, प्रिन्स चार्मिंग कसला ? डॉन क्विझोट आहे तो ! त्याला वाटतं मी त्याच्यावर प्रेम करीन ! " असं म्हणून ती मिस्किलपणें आपल्या मैत्रिणीकडं पाही. तिच्या मैत्रिणीहि त्यावर तितक्याच मिस्किलपणें हंसत.

मग ती म्हणे " किती लोचट आहे ना तो ? खरंच कां ग पुरुषजात इतकी निलाजरी असते ? मला नव्हतं वाटलं बाई हें असं असेल म्हणून ! "

" तें जाऊं द्या ग ! मी विचारते हा कोण म्हणजे कुठला राहणार, त्याचं नांव काय ? कोणत्या वर्गांत आहे तो ? वगैरे... "

" म्हणजे तुझा विचार आहे वाटतं त्याच्याशीं प्रितीचा झिम्मा खेळायचा? " सुलभा डोळे उडवीत तिला विचारी.

" छे ! छे ग ! मी पुष्कळ त्याच्यावर प्रेम करीन पण त्यानं केलं पाहिजेना माझ्यावर प्रेम. त्यानं तर सुलभाला केव्हांच पसंत केलंय; तेव्हां माझ्या प्रेमाच्या फुगडीचा आणि झिम्म्याचा प्रश्नच उरत नाहीं मुळीं ! " असं ती त्यावर खेळकर उत्तर देई. आणि मग त्या मुलींत थोडासा हंशाहि पिके. त्याच्या नांवागांवाचा प्रश्न मात्र त्यामुळं बाजूला पडे. त्याला कारणंहि होतीं. पहिलं कारण हे कीं तो मराठवाड्याचा रहिवाशी होता त्यामुळं महाराष्ट्रीयाना सहाजिकच त्याच्या नांवागांवाबद्दल कमी औत्सुक्य असे. आणि दुसरं असं कीं, कॉलेज तरुणीनीं त्याचं प्रेम थट्टेचा विषय केला होता, सहानुभूतीचा नाहीं. आणि थट्टेच्या विषयाला नांवागांवाच्या माहितीच्या गांभिर्याची काय गरज ?

पण देवीदासच्या बाबतींत मात्र या एकतर्फी प्रेमानं पुष्कळच गांभिर्य आणलं होतं. त्यानं दिवस विनाकारण भटकून व रात्रीं आलोचन जागरण करीत बिछान्यावर तळमळत काढल्या होत्या. त्याच्या या एकतर्फी प्रेमाची चेष्टा त्याची मित्रमंडळी वारंवार करीत असत; पण अशा चेष्टांचा त्याच्यावर फारच थोडा परिणाम होत असे. तो म्हणे " पहिल्या दृष्टीभेटीतलं माझं हें पहिलं प्रेम आहे. ती माझ्यावर प्रेम करते कां नाहीं हा मुळीं प्रश्नच नाहीं इथं. ती जशी अप्सरेसारखी सुंदर आहे तशींच देवीप्रमाणें सद्गुणी आहे, याची साक्ष माझ्या मनाला पटली आहे. आणि यापैकीं एका गोष्टीवरही वेडं व्हायला जग तयार असतं; मग या दोन्हीं गोष्टींचा एकाच ठिकाणीं मला साक्षात्कार झाला तर मी वेडं कां होऊं नये ? '

" वेड व्हाव कीं ! " रंगनाथ पेडगांवकर त्याचा अगदी निकटवर्ती मित्र त्याला म्हणे. " पण तूं हें जें आरोप तिच्यावर करतो आहेस ते बरोबर आहेत कां ? म्हणजे ती अप्सरेसारखी सुंदर आणि देवीप्रमाणं सद्गुणी आहे हें कशावरून ? "

" कशावरून तें कसं सांगूं ? सौंदर्य डोळ्यावाटें हृदयांत उतरलं आहे. आणि सद्गुणाची साक्ष तिच्या भोळ्या चेहऱ्यावरून व निरागस हास्यावरून मनांत ठसली आहे ! " देवीदास गंभीरपणें म्हणे.

" अरे या पोरींच्या भोळ्या चेहऱ्यावर आणि त्या निरागस हास्यावर जाऊं नकोस ! " रंगनाथ मिस्किलपणें म्हणे. आणि त्याच्या या टीकेकडें दुर्लक्ष करून देवीदास आपलं पुराण पुढें चालू करी—" बाकी तूं कांहींहि म्हण रंगनाथ, सुलभा किती छान आहे नाहीं ? तिनं माझ्या आयुष्यांत कसा प्रवेश केला तें मला समजलंसुद्धां नाहीं. पण मला वाटतं मी तिला युगानुयुगं शोधीत होतो आणि ती मला सांपडली आहे. आतां मी तिला खात्रीनं हातची जाऊं देणार नाहीं. पण सगळ्यांत मोठी अडचण हीच आहे कीं, माझ्या भावना तिला कशा समजाव्यात ? "

" सांगू तुला सरळ मार्ग ! तुझ्या भावना वगैरे सगळ्या बाजूला ठेव. तिची कशातऱ्हेनं तरी ओळख करून घे. आणि आपलं ' दिव्य प्रेम ' आणि

भव्य ' स्वर्गसुख ' तिला सांगण्यापेक्षां, तिला तुझ्याबरोबर या व्यवहारी जगांत अगदीं निवांतपणें राहतां येईल याची खात्री पटवून दे. मुली व्यवहारी असतात. प्रेम आणि लग्न हा त्यांच्या आयुष्याचा प्रश्न असतो. एकदां चूक झाली कीं मग त्यांना जन्मभर पश्चात्ताप करावा लागतो. तूं चांगला सधन आहेस, आणि मला वाटतं तुझ्या प्रेमाला जर हें समजेल तर ती खात्रीनं तुझ्यावर प्रेम करील ! "

" छीः छीः काय बोलतो आहेस हें. इतकी का ती व्यवहारी आहे ? तिचा चेहराच सांगतो कीं ती अत्यंत भावनाप्रधान, बुद्धीमान, कोमल अंतःकरणाची आणि त्यागी आहे म्हणून. मला खात्री आहे कीं, तिनं माझ्या हृदयावर केलेल्या नुसत्या जखमा मी जर तिच्यापुढं उघड्या करून दाखवल्या तर त्यावर उपचाराच्या मलमपट्या बांधीत ती जन्मभर माझ्याजवळ राहील. पण—पण हें व्हायचं कसं ? " तो विव्हळून म्हणे–" जे या चार वर्षांत शक्य झालं नाहीं तें आतांतरी कसं शक्य आहे ? खरंच मला कित्येकदा वाटतं कीं, मराठवाड्यांत जन्म घेण्यांत आपली थोडी चूकच झाली आहे ! "

आणि पुन्हां तो एक थंड आणि लांब निश्वास टाकी.

* * *

सुलभा आणि तिच्या मैत्रिणी यांच्याही लक्षांत देविदासची वागणूक येत होती, पण ती फक्त निराळ्या अर्थानं. त्यांच्या तो चेष्टेचा विषय झाला होता. देविदास लांबून दिसला म्हणजे सुलभेची एखादी मैत्रिण तिला कोपरानं हळूंच डिवचून म्हणे " तो पहा ग तुझा डॉनज्युआन तिथें उभा आहे. आहे बाई इंप्रेशन ! "

त्यावर सुलभा थोडीशीं हंसून आणि थोडीशीं चिडून म्हणे " अय्या, हीच कां माझ्या टेस्टची परिक्षा केलीत तुम्हीं. म्हणजे मी शेवटीं गोरीलावरच कां प्रेम करणार आहे ? "

त्यावर तिच्या सर्व मैत्रिणी खूप हंसत. आणि हास्याचा पूर ओसरल्यावर त्यातील एकजण चेष्टेच्या स्वरांत म्हणे—

" पण तुला माहित आहे सुलभा, तो खूप खूप श्रीमंत आहे म्हणे. तिकडं मोगलाईत कां मराठवाड्यांत त्याच्या खूपखूप जमिना आहेत, आणि घरची मोठी सावकारी आहे. शिवाय कापसाचा मोठा व्यापार असेलच त्यांच्याघरीं!"

त्यावर सुलभा म्हणे " अग मोगलाईतून आणि वऱ्हाडमधून येणाऱ्या सगळ्यांचं मुलांबद्दल असंच सांगतात. कुणाला ठाऊक त्यांच्याघरीं काय असतं तें. दुरून डोंगर साजरे. इथं येवून ऐट मिरवणारेच फार! "

आणि मग प्रेम, श्रीमंती वगैरेहून त्यांच्या गोष्टी लग्नाकडे वळत. जिथें प्रेम असेल तिथेंच लग्न करावें याविषयीं सर्वांचे अगदी एक मत असे. आणि त्या प्रमाणें त्या एकमेकींनां बजावीतही. सुलभा म्हणे " प्रेम आणि तेहि पहिलं; ज्याच्यावर जडेल त्याच्याबरोबरच आयुष्य घालवावं असं मला वाटतं. प्रेमाशिवाय लग्न म्हणजे विघ्न. "

" म्हणजे तूं प्रेम करते आहेस वाटतं कुणावर तरी. " तिची मैत्रिण म्हणे.

" नाहीं! मला वेड लावील असा पोरगा अद्याप भेटायचा आहे. "

" अग कसलं प्रेम आणि वेड घेऊन बसला आहांत. "

ती मधाची मैत्रिण म्हणे " व्यवहारांत कां कुठं हे असल्या स्वर्गिय प्रेमाच्या आणि दिव्य वेडांच्या चेष्टा चालतात. ते काव्यातलं प्रेम करायला पुरुषजात आहेच कीं रिकामी. आपणांस नाहीं बाई असले चाळे शोभत. मला तर वाटतं कीं आपण ज्याच्यावर प्रेम करतों त्याच्याशीं लग्न करण्यापेक्षां आपणावर जो प्रेम करतो त्याच्याशीं लग्न करणं आपल्या फायद्याचं आणि सुरक्षिततेचं आहे. बाकी तुम्हीं कितीहि आणि कांहीही बोललांत, प्रेमाबद्दल तरी माझी खात्री आहे कीं तुम्हीं, आम्हीं त्याच वाटेनं जाऊं ज्या वाटेनं आपल्या पूर्वीच्या स्त्रिया गेल्या आहेत. "

पण असलं व्यवहारीक बोलणं त्यांना आवडत नाहीं, असा त्या कॉलेजकुमारी दाखवींत. आणि आकाशातील उंच भरारीपासून जमीनीवर ओढल्याबद्दल त्या तिच्यावर थोड्याशा रागावतही.

अशा रितीनें तेही वर्ष संपत आलें. पण वर्ष संपताना एक गमतीदार घटना

घडून आली. तेवढीचा उल्लेख केला म्हणजे संपली ही पहिल्या प्रेमाबद्दलची गोष्ट !

*   *   *

मार्चचा शेवटचा आठवडा होता. कॉलेजला सुट्या झाल्या होत्या. मॅट्रीकची परिक्षा चालू होती. कॉलेजमधील बरेच विद्यार्थी घरीं न जातां अद्याप पुण्यांतच रेंगाळत होते. आणि मॅट्रीकच्या परिक्षेच्या वेळच्या त्यांच्या आवडत्या व्यवसायांत दंग होते. आतां सहा वाजून गेले होते. आणि देविदास पेन्डॉलच्या बाहेर दूरवर आपल्या सायकलवर रेलून परिक्षा संपून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांचें व विद्यार्थीनींचे निरिक्षण करीत होता. तों काय आश्चर्य ! सुलभा एका विद्यार्थीनीबरोबर पेंडॉलच्या बाजूनें येतांना त्याला दिसली. पहिल्यानं त्यानं त्या मुलीस ओळखलं नाहीं पण ती जवळ येतांच त्यानं तिला ओळखलं. ती रोहिणी कर्णिक होती. आणि आपण तिला ओळखलं हें दाखविण्याकरितां तो किंचित् हंसला.

सुलभाला वाटलं आपल्याकडं बघून हा हंसतो आहे. तिनं फणकाऱ्यानं आपली मान दुसरीकडं वळविली. रोहिणी म्हणत होती, ‘ सुलभा ! हे कोण, तुला माहित आहेत कां ? ’ आणि सुलभा त्यावर कांहीं झणझणीत उत्तरहि देणार होती, ‘ माहित का ? चांगला परिचयाचा आहे. अगदींच आचरट…’ पण तितक्यांत रोहिणी म्हणाली, ‘ हे देविदासराव देशपांडे ! ’

आणि सुलभाच्या मनांत नसतांना तिला त्याला नमस्कार करावा लागला.

‘ आणि ही सुलभा गुप्ते..’ देविदासनं दोनदां नमस्कार केला. रोहिणी म्हणत होती. “ कालच आम्ही आलों. अप्पा पण बरोबर आले आहेत. तुम्हीं कुठं भेटाल याची ते कालपासून चौकशी करीत होते; पण आमची अशी कल्पना झाली कीं, कॉलेजं बंद झालीं आहेत, तेव्हां तुम्ही घरीं गेला असाल! आतां तुम्हीं चला आमच्या बरोबर घरीं म्हणजे अप्पाची गांठ पडेल ! ”

सुलभेला अगदीं ओशाळल्यासारखं झालं. आणि यावेळीं जर आपल्या मैत्रिणींनीं याला आपल्याबरोबर पाहिलं तर त्या काय म्हणतील याची कल्पना करून ती थोडी मनांतल्या मनांत चिडली.

देविदासला मात्र आपण आतां स्वर्गांत आहोंत असं वाटायला लागलं. आपले पायसुद्धां जमीनीवर ठरत नाहींत याची त्याला प्रचिती येऊं लागली.

घरीं गेल्यावर अप्पासाहेबांनीं–रोहिणीच्या वडिलांनीं देविदासच्या सुलभेच्या वडिलांशीं अतिशय सन्मानानं आणि अभिमानानं परिचय करून दिला. सुलभाला तिच्या खोलींतही वसंतरावाचे खालील शब्द ऐकूं येत होते—

" बाबासाहेबांचं घराणं फार मोठं. ते जितके श्रीमान आहेत तितके नम्रही आहेत. वजन आणि दराराही तसाच आहे मराठवाड्यात त्यांचा ! त्यांचा शब्द म्हणजे कायदा ! " आणि थट्टेनं म्हणत होते– " देविदाससारखा जांवई ज्याला मिळेल त्याचं भाग्य ! हे जातीचं बंड आडवं येतं नाहींतर मी माझी रोहिणी खात्रीनं देविदासला दिली असती !... बाकी आतां जातीचं बंडही कमी व्हायलाच पाहिजे ! "

त्यावर सुलभाचे वडील म्हणत होते– " अहो कसलं जातीचं खूळ घेऊन बसला आहात डोक्यांत. पुण्या-मुंबईकडं तर सर्रास जाती तोडून लग्नं व्हायला लागलीं आहेत. "

देविदासला वाटलं, सुलभेच्या वडिलांच्या गळ्यांत मिठी मारावी, आणि त्यांचे हात हातांत धरून त्यांच्यावर अभिनंदनाचा नुसता वर्षाव करावा !

* * *

मग पुढं सात आठ दिवसांत देविदास व सुलभेची मैत्री वाढीस लागल्याचं सर्वांनीं पाहिलं. आणि एके दिवशीं तिच्या मैत्रिणीनं हळूंच त्याबद्दल सुलभेला विचारलं व आणखी हळुवारपणें आश्चर्य प्रगट केलं; तेव्हां सुलभेनंहि तितक्याच हळुवारपणें उत्तर दिलं—

" अग मी देविदासबरोबर लग्नच करणार आहे, तेव्हां आमची मैत्री वाढते आहे यांत आश्चर्य कसलं ? माझं हें पहिलं प्रेम आहे. खरंच तो अतिशय श्रीमान आहे ! "



# गुन्हेगार ! : :

: लेखक :
**श्री. ग. ना. अंबेकर.**

त्यावेळीं—

गतायुष्यांतील कांहीं ठळक प्रसंगांची स्मृती हीच त्याची सोबतीण बनली होती: आणि तो विषण्ण चित्तानें भराभर मागें पडणाऱ्या झाडांकडें बघत होता. त्याच्या मनांत उद्भवणारे विचार आगगाडीच्या वेगापेक्षांही झपाट्यानें धांवत होते; आणि खिडकींतून आंत शिरणारीं रविरायाचीं कोमल किरणें, त्याच्या नेत्रांतून झिरपून गालाच्या खोल खळगींत श्रांत पावणाऱ्या अश्रुवलया-वर चमकून अभ्राच्छादित आकाशांतील तारकाप्रमाणें नाहींशीं होऊन पुन्हां लुकलुकत.

गाडीला वांकडें वळण लागल्यामुळें तिचे कांहीं डबे त्याच्या नेत्रासमोर आले. जवळच्या सेकन्डक्लासमध्यें खिडकीजवळ एक तरुणी बसली होती. शेजारच्या बर्थवर असलेला एक फॅशनेबल गुजराथी तरुण सिगारच्या धुरांत आपली एक निराळीच दुनिया निर्माण करीत होता. डब्यांत या तरुणाशिवाय आणखी कोणीच नव्हतें. त्या तरुणीच्या, खिडकींतून बाहेर सोडलेल्या सुकोमल हातावर टेकलेल्या डोक्याच्या फोडीच्या वेणीच्या बेछूट बटा वाऱ्याच्या झोतानें भुरभुरत होत्या. तिच्या नुकत्याच झोपेंतून उघडलेल्या डोळ्यांत एक

प्रकारची मोहक मादकता त्याच्या तेजोहीन दृष्टीला दिसली. त्यानें आपले किलकिले डोळे जास्त ताणले आणि त्या सुंदर युवतीकडे एकवार बघितलें. लगेंच त्याच्या मनानें भूतकालाकडे धांव घेतली. पूर्वेतिहासाची पृष्ठें भराभर उलटलीं गेलीं आणि एक ठळक दृश्य तेथें स्थिर झालें. त्याच्या आंतरिक दृष्टीला तारुण्यांत नुकतेंच पाऊल टाकणारी उषा दिसूं लागली.

तेव्हां तो मनसोक्त दारु पिऊन नुकतांच घरीं आला होता. हातांत कुंचला घेऊन तो बोर्डवरचें चित्र पूर्ण करण्यास बसला. उषा दारांतून आपल्या पित्याच्या या कलानृत्याकडें सकौतुक आणि अनिमिष लोचनांनीं बघत होती. तें एका दरिद्री कुटुंबाच्या संसाराचें परम करुण दृश्य होतें. त्यांत एका दरिद्री बापाच्या मुलीचा लीलांव पुकारला जात होता. उषेनें त्या चित्राकडे अंगुलीनिर्देश करून विचारलें 'बाबा! जगाच्या बाजारांत स्त्रियांच्या पावित्र्याचा असाच लिलाव आणि अशीच लयलूट होते का हो?' त्यावेळीं कामांत गढलेल्या त्यानें एक अस्पष्टसा हुंकार भरला होता.

ह्या गोष्टीला एक वर्ष लोटलें आणि यापुढें त्याला मदिरेबरोबर रेसमैदानहि पहावेसें वाटलें. आणि अशाच एका दुर्दैवी दिवशीं त्या रेसकोर्सग्राऊन्डमध्यें त्याच्या हातून अवचित् खून झाला. ज्यावेळीं खुनी चित्रकाराला दीर्घ शिक्षा सुनावली गेली त्यावेळीं त्याच्या लाडक्या उषेचें भाग्यवान भवितव्य पूर्णपणें धुवून काढणारा असाच एक अश्रूंचा ओघ तेथें वहात होता. त्या वेळेपासून त्याला उषेचें दर्शन झालेलें नव्हतें.

पुन्हां एकवेळ तो डबा त्याच्यासमोर आला. त्यावेळीं त्या तरुणानें तरुणीच्या अधरावर आपला अधर ठेवलेला होता. त्या दृश्यानें तो संतापून गेला. त्यानें आपला अधरोष्ठ दांतांत धरला. 'काय, माझी उषा रखेली? अशक्य केवळ अशक्य!' संतापानें माथें फिरलेला तो खिडकींतून उडी घेण्याकरतां धांवला, परंतु साखळदंडाच्या खळखळाटानें पेंगत असलेले पोलीस जागे झाले आणि त्यांनीं आपला दोर आंवळून धरला.

तो धाडकन् तिथेंच बेशुद्ध पडला!



# खारा आड

: लेखक :
श्री. बालशंकर देशपांडे.

दे. भ. मोरोपंतांना घरीं जातांना राहून राहून सभेंतल्या गोंधळाचं हंसू येत होतं. अध्यक्ष म्हणून समारोपाचं भाषण करायला ते उभे राहिल्यावर सभेच्या तेरड्याला गुलाबाची कळा आली अन् तो गुलाब सैल सैल अंबाड्यांतला नसून आबालवृद्धांनाहि प्रिय वाटावा असा–अगदीं देव्हाऱ्यांतला होता–ही गोष्ट निराळी.

एक च्यवनप्राश्यावलेह बाटलीच्या आकाराचे गृहस्थ धडपडत टेबलापाशीं येऊन म्हणाले 'गांधींचं सूत हिंदुस्थानचा प्राण जातांना त्याच्या नाकाशीं लावायला मात्र उपयोगीं पडेल !'

'अन् केसरीच्या अंकांनं त्याला वारा घालतां येईल !' तितक्याच आवेशानं एक गांधिस्ट प्रत्युत्तरले, 'खबरदार प्लीज ! गांधींची नालस्ती हाच आमचा मृत्यु !'

'अन् त्यांची शैली हेंच आमचं जीवन !' त्या आवाजाची नक्कल करीत कुणीतरी बसूनच 'प्रवचन' केलें.

सभेंत शांतता प्रस्थापित व्हावी म्हणून मोरोपंतांनीं टेबलावरली घंटा वाजवली ! पण नारोशंकराच्या घंटेलाहि न जुमानण्याइतका आवेश एकेका वक्त्या-च्या अंगांत संचरला होता !

गांधीवादी बोलतच होता, ' आम्हीं मेलों उर्फ तुम्हीं गांधीची नालस्ती केली तर भूत होऊं, समंध होऊं, पिशाच......'

अगदीं हेच शब्द पंतांना पुनः पुनः आठवून हंसू येत होतं! ' गांधीवर टीका कराल तर आम्हीं तुमचा मुडदा पाडूं—निशस्त्र अन् सविनय मुडदा पाडूं ' असेहि प्रलाप काढायला गांधीभक्तानं कमी केलं नव्हतं!

मोरोपंताना वाटलं, ' कुठं टिळक, गांधीसारख्या लोकोत्तर विभूती अन् कुठं त्यांच्या नांवाखालीं लढणारे क्षुद्र पक्ष...पक्ष कसले? भर सभेंत माणूस-कीला नागवूं पाहणारे दुर्योधन, दुःशासनच हे! साऱ्या गांवाला पितृस्थानीं असणारे आपण मात्र धृतराष्ट्राप्रमाणं आंधळे नसून कर्मयोगाची शिकवण देणारे समाज सेवक...'

त्या कल्पनेचा सुगंध पंतांच्या मनांत कांहीं वेळ दरवळत राहिला. आत्म-स्तुतीच्या निषेधाचा ठराव पास करणाऱ्या रामदासस्वामीच्या मनाला देखील मराठेशाहीचा स्वातंत्र्य सूर्य तळपतांना पाहून शिवबाच्या डोक्यावर प्रथम वरद-हस्त ठेवला त्या दिवसाची आठवण होऊन गुदगुल्या झाल्याशिवाय राहिल्या असतील का?

फ्रेम करून भिंतीवर टांगावीं इतकीं सुंदर वाक्यें आज तूं बोलून गेलास, असा पंताच्या मनांत मंजूळ गुंजारव झाला. ' राजकारण म्हणजे नाट्य आहे, फार्स नाहीं ' ' आंधळा पक्षाभिमान म्हणजे पक्षवायूच, ' ' राजकारणांत भावना आली कीं क्षय्रही आलाच, ' हीं वाक्यें गोंडस बालकांप्रमाणं त्यांच्या मना-भोंवतीं खेळत होतीं!

आत्मचिंतनांत मनाला येणाऱ्या एक प्रकारच्या कैफांत म्हणा किंवा पत्नी-च्या हातचा गोड सुधारस चाखायची इच्छा अनावर झाल्यामुळं म्हणा पंत झपाझप पावलं उचलूं लागले. भर्रकन् पांखरांचा एक थवा घरट्याकडे गेलेला त्यांनीं पाहिला. ' याही वेड्यांचा लग्नदीन आहे वाटतं आज!' पंत मनाशींच म्हणाले. आज आपला लग्नदिन आहे याची त्यांना आतांपर्यंत आठवणसुद्धां नव्हती. बंगल्याच्या आवारांत शिरतांच घमूकन आलेला मोगऱ्याचा सुगंध, पडद्याआड जाणाऱ्या नर्तिकेप्रमाणं हळूंहळूं काळोखांत अदृश्य होत चाललेल्या

गुलाबाच्या कळ्या आणि मालतीबाईच्या मंजूळ कंठांतून येणाऱ्या स्वरमाला यांपैकीं अधिक मोहिनी कशांत आहे हें त्यांना खात्रीपूर्वक सांगतां आलं नसतं! गोड भाव-गीत, बहुधा ' मधुघटच ' ऐकायला सांपडेल या आशेनं ते पायऱ्याशींच थबकले, पण त्यांना ऐकूं आलं तें गीत ' रुद्रास आव्हान ' या गीताच्या तोंडावळ्यावर होतं.

{' मारूं अथवा मरूं आमुची मायभूमि जगवूं}..'

पंत सर्दच झाले. विळीवरून तरवारीवर या मथळ्याखालीं आपल्या बायकोचं स्फूर्तिदायक चरित्र कुठल्यातरी मासिकांत प्रसिद्ध होणार अशीं त्यांना आशा वाटूं लागली. दुसऱ्याच क्षणीं ते विषण्ण चित्तानं विचार करूं लागले, ' स्वातंत्र्याच्या मार्गाविषयीं किती विचित्र कल्पना असतात या कवींच्या! एकमेकांचे जीव घ्यायचे, रक्ताच्या नद्या वहायच्या, श्शी!—'

मधली एक पायरी सोडून ते चटकन दुसरीवर चढले. जणूं मधल्या पायरीच्या रूपानें ती भयंकर कल्पनाच टाळली त्यांनीं!

मालतीबाईबरोबर एक लिफाफाहि त्यांची वाट पहात होता. अवघ्या दोनच ओळी होत्या त्यांत. पण जणूं नागिणीच्या दोन जिव्हाच आपल्या दृष्टीस पडल्या आहेत अशा कल्पनेनं त्यांचं अंग थरारलं!

चिठ्ठीचे तुकडे तुकडे केल्यावर त्यांनीं पायावर दोन तांबे घेतले, गांधींच्या फोटोजवळ उदबत्ती लावली आणि भक्तिपूर्वक वंदन करून स्वयंपाक घरांत प्रवेश केला. मालतीबाई रांगोळींत गुलाल भरीत होत्या. पंतांना पाहून त्या म्हणाल्या, ' खादी अन् पगडी एका ठिकाणीं आली तर हिंदुस्थानचं राजकारणहि असंच...''

पण पंत त्यावेळीं श्रोत्याच्या भूमिकेवर कुठून असायला? दुष्यंत, मजनू, रोमीओ इ. मंडळींनीं त्यांच्या हृदयांत गर्दी करून सोडली होती. मालतीबाईचे दोन्हीं हात चटकन् आपल्या हातीं घेऊन ते म्हणाले, ' भविष्यकाळाइतकाच वर्तमानही सुंदर असतो कीं पण! तुझ्या रांगोळीचं प्रतिक...'

त्यांच्या टिचकीसरशीं मालतीबाईच्या गोऱ्यापान गालावर उठलेली लाली पुरती विरण्यापूर्वीच त्या ' इश्श ' म्हणून दूर झाल्या, अन् हंसत म्हणाल्या,

' कुणीं आडून पाहिलं तर या तीन रंगीं झेंड्यांत हिरवा रंगच अधिक आहे, अशी तुमच्यावर टीका करील कीं ! '

' अन् त्या झेंड्याची काठी देखील चांगली मजबूत आहे हें देखील प्रत्ययाला आल्याशिवाय रहायचं नाहीं मग बचंजीच्या ! हाः हाः ! हाः ! '

सात मजली हास्याच्या गच्चीवरून पंतांना जग अगदीं लहान दिसूं लागलं. ' प्रत्येकाचं जीवनवस्त्र मर्यादित आशा आकांक्षा भोंवतीं गुरफटलं जाण्यापेक्षां असं उन्हावाऱ्यांत, ऊंच, फडफडूं लागलं तर... '

' चिंतोपंत चीफसाहेबांकडून लिफाफा आलाय, बघितलांत ना? काय आहे?'

' खाऱ्या आडांत काय असणार ? मोती राहोतच, मीठसुद्धां मिळायची मारामार ! पकड वॉरंटाचा ग्वेकडा... '

' अगबाईऽ ! '

' तसं नाहीं कांहीं ! जेवण झाल्याबरोबर स्वारीनं ताबडतोब भेटीला बोलावलंय. पोलीसखात्याचं कारलं, स्नेहाच्या तुपांत तळलं अन् दयेच्या साखरेंत घोळलं तरी कडूं तें कडूंच रहायचं ! किती उर्मटपणानें लिहिलंय् ' आज ठीक नऊ वाजतां ऑफिसांत हजर व्हावें. सक्त जरूरी आहे. '

जेवतांना त्यांनीं लहानपणीं चिंनूला परीक्षेंत कोणतीशी कविता अडल्यावर फ्रीशिप बुडायच्या भीतीनं त्याच्या डोळयांत अश्रु कसे आले होते; आपल्या मनांत त्यावेळीं नीति अनीतीच्या भुतांपेक्षां अनुकंपेच्या पाखरांचा किलबिलाट होऊन आपण एका कागदावर त्या कवितेचा अर्थ अन् दुसऱ्या दोन प्रश्नांचीं उत्तरं लिहून तो कुणाला नकळत त्याच्याकडे कसा फेकला आणि परीक्षेंत त्याचा नंबर वर कसा आला हें सविस्तर वर्णन करून सांगितल्यावर म्हणाले,

' पण मडकं ऊंच गेलं कीं, ताडीनं मात्र भरतं, हें त्यालाच उद्देशून एकदां आमचे शिक्षक म्हणाले होते ते खरंच ठरलं. पास झाल्याच्या दिवशींच यानं सिनेमा पाहिला, सिगारेटस् ओढल्या, तमाशालासुद्धां आश्रय दिला. त्या दिवशीं त्याच्या तोंडाचा धुरकट वास येतांच तिरस्कारानं तोंड वळवून मला टाळतां आला पण आज त्याची चिठ्ठी फाडूनही तिच्यांतला दर्प असह्य होत आहे ! '

'आत्तां कळलं सारं कांहीं!'

'काय कळलं? असं विचारण्याऐवजीं गुप्त पोलीसाच्या चातुर्यावर अजून नाटक कसं कुणी लिहीत नाहीं असाच पंतांना प्रश्न पडावा, इतका मालती-बाईनीं सुरेख अभिनय केला.

'काल राममंदिरांत चिंतामणरावांची आई आली होती. एकनूर म्हातारी अन् दसनूर शेंदरी असं म्हटलं तर वाया जायचं नाहीं कांहीं! जितका पगार मुलाला त्याच्या दुप्पट ठिगळं तिच्या लुगड्याला असं एकंदरींत व्यस्त गणित होतं तें!'

'बुवांनीं परशुरामाचं आख्यान लावलं होतं. रेणुकेवर परशुरामानं तरवार उगारल्याचं वर्णन चाललं असतां श्रोते गहिंवरून आले. बायका मंडळींत तर काय? त्यांचे डोळे म्हणजे चालू महिन्याचीं कॅलेंडरंच वाटूं लागलीं. मी यशो-दाबाईकडे पाहिलें. अकोल्याचा रखरखीत उन्हाळाच दिसला तिथं! पण लगेच त्याचा उलगडाहि झाला.'

'बिचारीला दोन वर्षांत चिंतामणरावांनीं एकदांहि 'आई' अशी हांक मारली नव्हती! 'दिसणाऱ्यापेक्षां अशा न दिसणाऱ्या तरवारीच मातृहृदयाला अधिक जखमी करतात.' असं म्हणतांना मात्र त्यांचे डोळे भरून आले होते.'

* * *

पंत स्वतःच्या बंगल्याबाहेर पडले त्यावेळीं सृष्टीला सिनेमा थिएटरची कळा येऊन थोड्याच अवकाशांत आकाशाच्या पडद्यावर पावसाचा चित्रपट सुरूं होणार असा रंग दिसत होता. विजेच्या पंख्याशिवायच तुफान वारें सुटलें होतें. बालिश वृत्तीचे वृक्ष चित्रपट लवकर सुरूं व्हावा म्हणून टाळ्या पिटून शीळही घालीत होते तर गंभीरवृत्तीच्या टेकड्या आणि इमारती स्तब्धपणें वाट पहात होत्या.

पंतांच्या अंतःकरणांत मात्र चांदणं टिपूर पडलं होतं. त्यांना वाटलं, 'त्या चांदण्यांत आपण अन् मालू लग्नदिनानिमित्त प्रीतीच्या गोष्टी करीत बसलों आहोंत, खट्याळ मनाचा चिंतू विश्वामित्राच्या रूपानं आपणांवर सत्तेचा धोंडा टाकण्यासाठीं टपून बसला आहे, पण आतां थोड्याच वेळांत, आपल्या

हृदयांतली त्याचं चारित्र्य सुधारण्याची तळमळ त्याच्या दृष्टीस पडेल अन्...'

धोंड्याचीं फुलं झाल्याचं स्वप्न अनुभवीतच पंत चिंतामणरावांच्या घरीं जाऊन पोहोंचले.

पण फुलांऐवजीं आणखी एक लिफाफाच त्यांच्या हातीं पडला.

कुठल्याशा खेडेगांवीं चिंतामणराव तांतडीनं निघून गेल्याचं त्यांच्या पत्नी-कडून पंतांना कळलं.

घरीं जाऊन पंत वाचूं लागले,

" प्रिय सुहृद्—तुझ्या गांवीं बदली होऊन आठ दिवस झाले पण एक दिवस कांहीं तुझ्याशीं निवांतपणें बोलायला फुरसत मिळत नाहीं. एकच गुन्हा घडलेल्या रामकाळांत पोलिस खुशाल वशिष्ठाचं पुराण ऐकत बसले असतील नाहीं ? पण आज मी लगबगीनं दुसऱ्या गांवीं निघून जात आहे तें एखाद्या गुन्ह्याचा तपास लावण्यासाठीं नव्हे–त्याची पूजा करण्यासाठीं !

' खाऱ्या आडांतल्या पाण्याला वाळयाचा वास कुठून लागला, ' असा तुला प्रश्न पडला असेल. खरंच, शाळेंतल्या एका बालकवीनं मला खाऱ्या आडाची उपमा दिली होती, ती किती सार्थ आहे ! त्यावेळीं मला हॉटेलांतली खारी बुंदी फार आवडायची म्हणून ती उपमा दिली असेल, पण आज किती निराळ्या अर्थानं मनाला पटते !

' मोरू, पाळण्यांत मुलांचे पाय दिसत असतील, डोकं नाहीं ! पाणी ज्या भांड्यांत ठेवावं त्याचा आकार त्याला मिळाल्यासारखा दिसतो खरा पण तिथून देखील तें वाफेच्या रूपानं निरनिराळे आकार धारण करूं पाहतं ! जीवनाचं तरी असंच नाहीं कां ? उनाड मुलांच्या संगतीचा पुढें लवकरच मला वीट आला. दुसऱ्याचं दळण करून आईनं जमवलेल्या आठ आण्यांत मी एकदां सिनेमा पाहून आलों, त्या दिवशीं गवळयानं दूध द्यायचं नाकार-ल्यामुळं आईला दशमी करतां आली नाहीं. उपाशींपोटीं निजलेल्या तिच्या मूर्तीवर मी रात्रभर अश्रूंचा अभिषेक केला. निवळलेला माझा जीवनप्रवाह पहायला पुढें तूं राहिला नाहींस. मी भराभर परीक्षा दिल्या, बक्षिसें मिळविलीं–

' विकास ! विकास ! याच समाधानासाठीं ची उलतं, ज्योत जळते अन्

स्त्री ओकाऱ्या देते !

" शाळेच्या जगांतून बाहेर पडतांच कांहींतरी अलौकिक कार्य करुन दाखवावं असा मनानं ध्यास घेतला, लहान मोठ्या प्रत्येक चळवळीच्या यादींत मी आपलं नांव दाखल करावं अन् ते आईच्या अश्रुनी पुसलं जावं असाच क्रम घडूं लागला. माझ्या एका पेन्शनर मामांनीं आपलं वजन खर्च करून ही नोकरी लावून दिली. पण जीवनाच्या वाक्याला पुरता अर्थ येण्यापूर्वींच चुकून पडलेल्या पूर्णविरामासारखी वाटूं लागलीं ती मला !

' नोकरीच्या खळग्यांत पडलेलं माझं जीवन हळूं हळूं खारं बनूं लागलं. पाणपोईत शिरून ताहानेल्या वाटसराला आराम द्यायचं भाग्य त्याला आतां कुठून मिळायला ? एकवेळ दारिद्र्यानं गांजलेल्या अन् माझ्याकडून दुखावल्या गेलेल्या आईच्या मनाविरुद्ध कांहींहि करायचं नाहीं हा एकच निश्चय मी बाळगला आहे.

बाकी मनाची कशी गंमत आहे बघ. आई समोर नसली म्हणजे तिच्या फोटोला वंदन करतों मी, पण एरव्ही मोकळ्या मनानं कांहीं ' आई ' म्हणून हांक मारावीसी वाटत नाहीं !

' आईनं माझ्या लहानपणीं वापरलेली शेंदरी अजूनहि जपून ठेवली आहे. गरीबींत प्रामाणिकपणानं कंठलेल्या आयुष्याची साक्ष अजूनहि कधीं कधीं नेसण्यांत तिला समाधान वाटतं !

' माणसाच्या विचित्र स्वभावाचा हा दुसरा नमुना !

' अशाच सुखदुःखाच्या गोष्टी तुझ्याजवळ बोलाव्या म्हणून घरीं बोलावलं होतं. पण तुला तो लिफाफा मिळाला असेल नसेल तोंच एक निनांवीं पत्र हातीं पडलं, ' उंबर गांवीं वसंत कुळकर्णी नांवाचा तरुण इसम क्रांतिकार-कांच्या कटांत सामील आहे. सावध असावें, असा त्यांत इषारा होता.

' मोरू, क्रांति म्हणजे वीज ! जग चंद्राला सोडून विजेला दशा वहात बसत नाहीं, हें खरं आहे; पण धरणीमाता हिरव्यागार धनधान्यानं नटवायची असेल तर आधीं विजेचा कडकडाटच नको कां होऊं द्यायला ? आज टिळक जयंती ना ? अशा पुण्य दिवशीं त्या महाभागाचं दर्शन घडावं म्हणून उंबरगांवीं जात

पत्रांतलं अक्षर मात्र तुझ्या अक्षरासारखंच होतं, हा चमत्कार नाहीं कां ? पण चमत्कार तरी कसला ? तुम्हीं गांधीभक्त आपला विशिष्ट पंथ जगवण्यासाठीं स्वातंत्र्याला देखील तीलांजली द्यायला मागं पुढं पाहणार नाहीं !

'राग येऊं देऊं नको अं ! सहज थट्टा केली तुझी. जगांत चेहेऱ्यासारखें चेहेरे असतात, अक्षरांची कुठं कथा आली !—चिंतू'

'ता. क. अरे खरंच ! तुला मुद्दाम हुकुमी शब्दांत यायला कां लिहिलं होतं कळलं कां ? येरव्ही माझ्याकडे यायला तुला अनमान वाटेल अन् मग तुझ्या आवडीची शेंगदाण्याची खिचडी चुकेल म्हणून आपली गंमत करून पाहिली. बाकी, टिळकजयंतीचा उपवास तुला कुठून असणार म्हणा ?'

* * *

पंतांनीं पत्राची घडी करतांना खिडकीबाहेर दृष्टी टाकली.

निसर्गांतला पावसाचा चित्रपट संपून तारकांचे दिवे लुकलुकत होते. दूर कुठं तरी एक ढग गडगडला. खेळ संपल्यावर, बाहेर पडतांना प्रेक्षकांत होणारी धांदलच जणूं ! पण पंतांना वाटलं, जगाची तहान शमवायच्या बुद्धीनं तळमळणाऱ्या समुद्राचं हृदयच बोललं तें !

आतां आपल्या मनांत वादळ सुरू होणार अशीं त्यांची खात्री झाली.



# पाचोळा : :

: लेखक :
**श्री. वि. भा. पाठक.**

त्या ओसाड रानांतील तो मोटा वृक्ष, किती वर्षांचा जुनाट असेल कोण जाणे ! त्याखालीं पाचोळ्याचा थर साचलेला दिसत होता.

झाडावरून गळून पडलेलीं पानें तीं ! झाडाला कंटाळा आला होता त्यांचा !

आणि आतां तीं निराधार होऊन त्याच्या पायथ्याशीं लोळत होतीं.

सकाळच्या रम्य थंडाव्याचें अन् दुपारच्या प्रखर उन्हाचेंहि त्यांना कांहींच वाटत नव्हतें !...वाऱ्याच्या एका बारीक झुळकीसरसी झाडावरचीं कोवळीं पानें खालच्या पाचोळ्याकडें पाहून तुच्छतेनें हंसलीं—

" किती दरिद्री पानें हीं ! वृक्ष देखील कंटाळला यांना अंगावर घेऊन-"

पाचोळा वाऱ्यावर उडत होता. वरच्या पानांना हंसूं कोसळत होतें !—

वाईट वाटलें त्या निराधार पानांना वृक्षावरील पानांवर सूड उगविण्यासाठीं-च कीं काय पाचोळा एकवेळ फांद्यापर्यंत उडाला ! पण क्षणांतच सामर्थ्यहीन होऊन त्याला खालीं यावें लागलें !...एका काळीं उपभोगिलेल्या त्या हिरव्या वैभवाची आठवण त्याला अस्थिर करूं लागली.

दिवसामागून दिवस गेले. शिशिराचीं पाउलें झाडावरील हिरवीं पानें निर्दयतेनें तुडवीतच उदीयमान होऊं लागलीं. वृक्षावरचीं उपहास करणारीं पानें गळून पडत होतीं ! त्यांना वाटूं लागले..." आपण उगीच उपहास केला. आतां आपणही खाली पडून पाचोळा होऊं आणि नवीं हिरवीं पानं...! "

जगाच्या या अफाट वृक्षावर मनुष्य प्राणीही असाच एक दुसऱ्याचा उपहास करतात, अपमान करतात नि शेवटीं पश्चाताप पावतात ना ?—

# जग कुठं चाललं आहे ? : : लेखक : —बी. रघुनाथ.

संध्याकाळ झाली कीं आभाळांत ढगांची व जानीच्या मनांत उदास खिन्न विचारांची गर्दी होत होती. न सुटणाऱ्या वाऱ्यावर अन् न वसरणाऱ्या ढगावर ती रागावत होती. तिच्या दारापुढून जाणाऱ्या अन् तिच्याकडं डोळे भरून पाहाणाऱ्या लोकांना मनांतल्या मनांत लाख शिव्या द्यायचा तिचा स्वभाव झाला होता !...

डाव्या बाजूला रंग रंगोटी केलेलं चंफीचं घर होतं. चंफी थोडंसं गात होती अन् नाचत होती. अन् नवं अंग असल्यामुळं जरा बरी दिसत होती. पण काय तिचा दिमाख ! अन् लोक तरी काय पण ! मुलामा दिलेल्या खापरासाठीं मरमर करणारे ! चंफीमुळें जानीच्या धंद्याला थोडासा उतार लागला होता.

उजव्या बाजूला टक्की राहात होती. व बारा तास दाराबाहेर बसून गिऱ्हाइक टेहळीत होती. ' खानदानी वेश्या ' असा एका काळचा तिचा लौकीक होता. अन् भर जवानींत तिनं म्हणे लोकांना नुसतं भारून टाकलं होतं ! पण आतां दिवाळं निघालेल्या कंपनीचा क्लीयरन्स सेलही तसाच अडगळींत पडावा तशी तिची अवस्था होती. अडलेल्या गिऱ्हाइकाला कधीं घाऊक माल तर कधीं चोरी छपीचा मामला आडमापानं विकण्यांत ती फार तरबेज होती. नुसत्या दरवानगीवर अन् दलालीवर काय पण लुबाडीत होती ती लोकांना ! अन् जानीला म्हणत होती भागीदारी ठेऊंदे ! जानी काय आजवर तिच्याच जिवावर जगत आली होती ?...

## जग कुठं चाललं आहे ?

जानीच्या दारापुढून उजव्या बाजूला सरकारी दवाखान्याचं कंपाऊंड दिसत होतं. कंपाऊंडाच्या बाजूनं एक रस्ता वहात होता. केव्हांही पाहिलं तरी घासून गेलेल्या जमिनीच्या उरावरली ती रस्त्याची रेषा अगदीं स्पष्ट दिसत होती. अन् तिकडं पाहून जानीच्या मनांत कांहींच्या बाहीच विचार येत होते. रस्त्यालगतच एक विहीर होती. तिला तिचं सार्वजनिक स्वरुप कांहीं झाकतां येत नव्हतं. वाटेल त्या वाटसरानं तहान लागली कीं विहीरीवर यावं, अन् आपली तहान भागवून चालतं व्हावं असाच क्रम कैक दिवसापासून चालत आला होता. या जगांतले वरवरचे किंवा जिव्हाळ्याचे संबंध कांहीं निराळे असतात थोडेच !...

आभाळ, लोक, चंफी, ठकी, रस्ता आणि विहीर यांतून फिरणारं तिचं विचारचक्र शेवटीं समोरच्या भल्या उंच चाळीवर येऊन आदळत होतं. त्या चाळींत अन् तिच्या घरांत जेवढं अंतर होतं त्यापेक्षां अनेक पटीनं तिच्या अन् चाळींतल्या जीवनक्रमांत होतं ! तीन मजली चाळीची ती उंच पाटभिंत म्हणजे दोन भिन्न संस्कृतींत उभारलेला एक अजस्त्र तटच !

अलिकडं स्वतःच्या रुपाविषयीं जानीच्या मनांत धास्ती निर्माण झाली होती कीं काय नकळे ! दाखवायचा पोशाख केल्यावर आरशांत वेळोवेळां ती डोकावून पहात होती. आरसा तिच्याशीं प्रामाणिक असला तरी तिचं मन फारच शंकाखोर झालं होतं. वार्धक्य आपल्या चेहऱ्यावर चोरपावलांनीं फिरकतं आहे असं उगीच्या उगीच वाटलं कीं वेड्यासारखें तोंडावर पावडरचे थरावर थर ती लेपीत होती. डोळयांतला सुरमा चुकत नव्हता. कटाक्षांतून निसटलेलं सावज निदान डोळयांतल्या सुरम्यानं तरी घसरून पडेल असं तिला वाटत असावं ! वास्तविक वार्धक्य तिच्यापासून किती तरी दूर होतं. एखाद्या खवळलेल्या सागरांत गटंगळया खाल्लेल्या माणसाचा थकवाच काय तो तिच्या चेहऱ्यावर होता ! सरकत चाललेल्या वयानं अद्याप तिला कंगाल करून टाकलं नव्हतं ! प्रसाधन करून ती खिडकीपाशीं आली की रस्त्यावरील येणाऱ्या जाणाऱ्यांच्या मोकाट नजरा तिजवर आदळत होत्या ! पण क्षणिकच तें ! जगाला तिचं खरं रहस्य केव्हांच कळून चुकलं होतं ! शिळया भक्षाकडं पाह-

णार तरी कोण?... एका काळीं जें जग तिच्याकडं ओढलं जात होतं, ज्यासाठीं वेळीं, अवेळीं, कधीं सोत्सुक तर कधीं अनुत्सुक, कधीं आनंदानं तर कधीं आनंदाच्या नुसत्या अभिनयानं ती झिजली होती, तें तिचं जग आतां तिला तुच्छ लेखीत होतं! जुन्याकडून नव्याकडं चाललं होतं तें! जानी-कडून चंपीकडं अन् चंपीकडून आणखी पुढं कुठं तरी जाणार होतं तें! त्याचे विलक्षण आघात झेलतां झेलतां जानी मात्र मागेंच रेंगाळत राहिली होती! पुढं गेलेल्या जगाच्या पाशवी वृत्तीच्या आठवणी अन् उतरत्या वया-ची दाहक जाणीव एवढंच काय तें आतां तिजजवळ उरलं होतं. अन् तशांत समोरच्या चाळीच्या उंच पाठभिंतीच्या खिडक्यांतून कैक अर्थगर्भ नजरा तिला तिच्या आयुष्याचा जाब विचारीत होत्या! जणुं काय एखाद्या इंद्रपुरीं-तलें लोक पृथ्वीच्या कुठल्यातरी तुकड्यावरल्या क्षुद्र मनुष्याकडं उपहासानं पहात होते! कालाचा अफाट आणि अथांग प्रवाह केवळ जानीच्याच अस्ति-त्वानं मलीन झाला आहे असंहि त्यांना वाटत असावं!

पण जानी तरी कमी होती? पानाची भली मोठी पिचकारी टाकून आपल्या अपमानाचा ती सूड उगवून घेत होती. समोरच्या चाळीबरोबर समंध जगाची किंमत करीत होती!

* * *

शेजारच्या खोलींत आतां नुसता शुकशुकाट राहणार, कुणाचीहि तिथं आतां हालचाल नाहीं, सामसूम झाल्यावर दाराला कुणी टिकटिकत नाहीं, कुणी हंसत नाहीं, कुणी बोलत नाहीं, अन् कुणी बोलावीत नाहीं, हें तीव्रतेनं जाणवूं लागल्यावर राजाला अभ्यास सुचेनासा झाला. परीक्षा जवळ आली आहे हें आपल्या मनाला सांगण्याचा तो प्रयत्न करूं लागला. पण शेजारची ती रिकामी खोली त्याला स्वस्थता लाभूं देईल तर ना!

शेजारची खोली!...

खोलीचा मालक!...आणि त्याची बायको!

ती जितकी नाजुक आणि सुंदर तितकाच तो रानवट आणि विद्रुप! नशि-बाचीच कांहीं तरी गफलत होऊन ती त्याच्या गळ्यांत अन् घरांत अडकली

होती. एका विमा कंपनीचा एजंट होता तो! कंपनीच्या कामासाठीं महिना महिना तो फिरतीवर राहायचा, अन् परत यायचा तो संतप्त होऊनच! रागवायला त्याला एखादं कारण पुरेसं होई. त्या भरांत तो तिला झोडपून काढीत होता, हें सबंध चाळीला माहीत होतं! तो तिला मारतो ही कल्पनाच राजाच्या तरुण आणि सौंदर्याकांक्षी मनाला सहन होणं शक्य नव्हतं! तरुण आणि सुंदर स्त्री! तिच्या नाज़ूक आणि उन्मीलनशील मनाची एकेक पाकळी उलगडून आंतील गंध रसिकतेनं लुटायचा! पण इथं तर साराच प्रकार उलटा! केवड्याच्या परिमलांतली मधुर सुस्ती अनुभवायची सोडून एखाद्या खवळलेल्या भुजंगासारखा तो तिजविषयीं दुष्ट हेतू मनांत धरीत होता!...

नवरा गांवीं गेला कीं लीलावती मोकळी! हातांत येतील तीं पुस्तकं ती वाचीत होती. अन् जिकडं मन झुकेल तिकडं झुकूं देत होती. यौवनाच्या नाजूक देणग्यांचाही भार होईल अशी तिची सुकुमार देहलता! मन मात्र नित्याच्या अपेक्षित प्रहारांनीं खूप कणखर झालं होतं! विचारांतला ताठरपणा कांहीं और होता!

राजाला चांगलं आठवत होतं कीं एकदां तो तिच्या दारापुढून येत असतां लीलावतीनं म्हटलं होतं — "काय हो राजाभाऊ! डोळ्यांना आज अगदीं स्वाधीन ठेवून जात आहां?"

राजाचं उत्तर धड ओंठावरही आलं नव्हतं तोंच तिनं पुनः म्हटलं—

"बरं! बरं! पुरे झाला विनय! चहा ठेवला आहे म्हटलं! पुस्तकांचं ओझं ठेवून या लगेच!..."

तो तिच्या खोलींत आला तेव्हां ती चहाकडं लागली होती. दुमडून आंथरलेल्या एका सतरंजीवर तो बसला. जवळच पेटी उघडून ठेवली होती. पेटीवर नोटेशनची वही देखील होती. तिकडं पाहून तो सहजच वाजविण्याचा प्रयत्न करूं लागला—

"ध ऽ नि ऽ सा ऽ ग ऽ रे ऽ ऽ—"

"हं! गांधार कोमल पाहिजे. मी चहा करते आहे म्हणून तिकडं तुम्हीं कॉफीची खिचडी करूं नका!..."

ती मुक्तपणानं हंसली. समोरच्या पेटींतल्या तिन्ही सप्तकांतील उत्तेजक पण अत्यंत मधुर अशा संमिश्र स्वरांचा ध्वनिच आपण ऐकत आहों असं राजाला वाटलं. तो म्हणाला, " मला नाहीं जमत! मी आपलं सहजच पाहिलं!..."

" तें दिसतंच आहे. पण आतां तरी नाजुक वस्तूंचीं व्यवधानं कशीं सांभाळावीं हें लक्षांत आणा! शिकतां कां मजजवळ पेटी?..."

" या कोमल तीव्रांच्या भानगडींत मी गडबडून जाईन! तुमचे पेटीमास्तर आतांशा दिसत नाहींत?..."

" संगीतासारखा विषय काय म्हाताऱ्याजवळ शिकायचा? त्याचीं ती लांब शुष्क बोटं माझ्या पेटीच्या चमकत्या पट्ट्यावर फिरतांना पाहिलीं कीं माझ्या अंगावर कांटाच उभा रहात होता!..."

—हळूंहळूं चाळींत कुजबुज सुरू झाली. एका विमा एजंटाची मोकाट बायको एका तरुण विद्यार्थ्याशीं एवढ्या सलोख्यानं वागते म्हणजे काय? अनीति! व्यभिचार!...त्याच चाळींत राहणारे राजाचे आवडते मास्तर गांजवे यांच्याही कानावर ही बातमी थडकलीच! मास्तराच्या निष्कलंक चारित्र्याची कीर्ति चाळीच्या कोना कोपऱ्यांतून घुमत होती. आदर आणि आपुलकी हे देखील त्यांच्या व्यक्तित्वाचे हक्कच होऊन बसले होते! प्रथमपत्नी वारलेली! पुनर्विवाहाची तीव्रतर अनिच्छा! सामाजिक कार्याची आत्यंतिक तळमळ! यांचीहि कांहीं गमकं मास्तरावरूनच ठरवलीं जात! राजा त्यांच्या ध्येयकल्पनावर त्यांच्या विश्वव्यापी उदात्ततेवर बेहद्द खूप होता! अत्यंत हलाखींतून दिवस काढून त्यांनीं आपलं जीवन ज्ञानसंपन्न करून टाकलं होतं! बुद्धिमन्ताच्या जगाला सहजासहजीं हलवून सोडणारं त्याचं सामर्थ्य पाहून राजा दिपून गेला होता! आदर्श मानलेल्या व्यक्तीच्या मनांत असा विकल्प येऊन आपला उपासनेचा हक्क तर हिरावला जाणार नाहीं ना अशी शंका राजाच्या मनांत आली. लीलावतीकडं जाणं येणं आपण बंद केलं पाहिजे असंहि त्यानं निश्चित केलं. पण तें आतां त्याच्या हातीं नव्हतंच! अन् लोकापवादाना राजाचं लाजरं मन भीत आहेसं दिसतांच लीलावतीनं म्हटलं होतं—

" नसत्या सन्मानानं जगण्याचा आव आणणारा हा समाजाचा मधला

थर आंतून इतका कुजला आहे की विचारूं नये ! नीति अनीतिच्या सारख्या विचारानं आपल्या मनाच्या मागण्यांचाही यांना विचार करतां येईनासा झाला आहे ! जीवनाची खरी चव या लोकांना कधींच कळणार नाहीं ! अन् कळली तरी ती घेतां येणार नाहीं ! संपत्तीचं वैपुल्य मार्गाविषयीं चोखंदळपणा कधींच करीत बसत नाहीं ! अन् दारिद्र्य सगळीकडूनच नागडं उघडं असल्यामुळं चांगल्या वाईटाचे तिथं विचारहि संभवत नाहींत ! दारूसारखी पेयं गरीब खुशाल पितातच कीं नाहीं ! दारू पिणं वाईट असेल ! पण पिण्याची हौस तर त्यांना भागविता येते ना ? पण या चाळींतले संकेत फार निराळे आहेत ! मन मारायचं असा येथला प्रघात आहे. चैन करायची म्हटलं तर धड जवळ पैसा नसतो अन् बेछूट होण्यासाठीं लागणारं मानसिक धैर्य तर मुळींच नसतं ! खरंच या चाळींतलें लोक जगताहेत तरी कोणत्या आशेनं ? अन् मरणार तरी कोणता मोह धरून ?..."

—ते सिनेमाहून परत येत होते. त्या रोमांचकारी प्रणयकथेचा उन्माद अजूनही त्यांच्या मनावर तरंगत होता. चाळींतली कुजबुज अथवा त्यांच्या हालचालीवर पाळत ठेवणाऱ्या चोरट्या नजरांची मुळींच पर्वा न करतां ते थिएटरांत गेले होते. अन् भारावलेल्या अंतःकरणानं परत येत होते. कांहीं दृष्यें तर राजाच्या डोळ्यापुढून पुनःपुन्हा सरकत होतीं. उन्मादक नृत्यांतच प्रवेशाचा प्रारंभ झाला. मोठ्या झोंकदार लयींतला गझलचा चरण गात गातच नर्तिकेनं मद्याचा चषक नायकाच्या हातीं दिला. नर्तिकेचं अर्धावृत सौंदर्य व मद्यावरला फेस यांचा कांहीं तरी समन्वय जुळवीत नायकानं प्याला ओठाशीं लावला अन् आपल्या ओठावरले मद्याचे डाग तिच्या ओठांनीं पुसून काढले. हातांतली बॅटरी उघडण्याचें भान राजाला राहिलं नाहीं. लीलावतीचा पाय एकदम घसरला. अन् मग तिला त्याच्या आधारानं चालण्याशिवाय गती उरली नाहीं. " सारखं अंधारांतच ठेचाळत नेतां आहां राजाभाऊ ! " असं कांहींतरी ती म्हणत होती. राजा स्तब्धच होता. आपणहून आपल्या ताब्यांत आलेला लीलावतीचा हात खूप घट्ट दाबून धरावा आणि आपल्या अंतःकरणांतील अस्फुट आणि कंपाकूल भावनांचं शांतवन करून घ्यावं असं त्याच्या

मनांत राहून राहून येत होतं. पण प्रणयपंथावर नव्यानंच पाऊल घातलेल्या राजाच्या कांपऱ्या हातांना तेवढा धीर झाला नाहीं.

ते चाळींत आले तेव्हां कुणी तरी त्यांच्याकडं कंदिलाच्या उजेडांत पहात होतं. लगेच धाडकन् दार बंद केलं गेलं!...हरिभाऊ जोगळेकर होते ते!... लीलावती हंसली होती अन् म्हणाली होती—" हा पुण्यात्मा म्हणजे चाळीं-तल्या जीवनाचं एक प्रतीक आहे! सबंध जगांत थोडंसं कुठं खट्ट झालं कीं आधीं यांच्या कानावर हटकून यायचं! जगाचे नैतिक व्यवहार सुरळीत चाल-विण्याची सारी जबाबदारी अ पल्याच शिरावर येऊन पडली आहे अशी यांची भावना! आपल्या खिडकींतून दिसणाऱ्या वेश्यांचा तर यांना अतिशय तिट-कारा! पण स्वतःच्या घरांत उघड उघड यांनी एक तरुण पोरगी डांबली आहे! लग्नाच्या नांवाखालीं तिला यांनीं पद्धतशीर वेश्या बनविलं आहे! तिचं या म्हाताऱ्यावर प्रेम असेल कां? तिला तिच्या कांहींतरी स्वतंत्र आवडी-निवडी असतीलच ना! पण जबरदस्तीच्या सामाजिक बंधनापुढं त्या मुलीचं काय चालणार? हा शास्त्रसंमत व्यभिचार!...या चाळींतल्या प्रत्येक खुराड्यां-तून कोंडलेलीं श्वसनं अगदीं जवळून ऐकलीं तर अशाच जबरदस्तीच्या व्यभि-चारांना कंटाळलेल्या किती तरी मनांचं सत्यदर्शन होईल!..."

—राजा लीलावतीच्या खोलींत शिरला होता! दूरवर कुठंतरी मंजुषेचे अस्पष्ट स्वर लंहरत होते. रात्र स्तब्ध आणि आंधळी असली तरी कुणीतरी पाहील कीं काय अशी राजाला सारखी भीति वाटत होती. अन् मग त्याचं काळीज अधिकच धडाडून जात होतं. हलकेच त्यानं दार बंद केलं! पलंगा-च्या कडेला उभा राहून तो लीलावतीकडं पहात राहिला. ती शांत झोंपली होती. ओठावर मंदस्मित होतं. मिटलेल्या रातकमळावर चंद्रकिरण पडावे तसा स्मितानं तिचा निद्रिस्त चेहरा दिसत होता! लीलावतीच्या इतक्या जवळ येऊनही पुनः त्याची धडधड त्याला मागें हटवूं लागली. लीलावतीला जागवलं तर आपल्या वाट्याला निर्भत्सना कीं रुकार येईल हें त्याला समजलं नाहीं. तोंच लीलावती जागी झाली. स्मितानं तिचा चेहरा अधिकच प्रसन्न दिसूं लागला! राजाला वाटलं आपल्या दुर्बल प्रवृत्तीचा ती उपहास करीत आहे!

राजा परत फिरूं लागला. लीलावती आपल्या शांत व आर्जवी स्वरांत म्हणत होती—"राजाभाऊ ! या ना ! कां आला होतां ? अन् असे परत कां जातां?"

बाहेर कुणाची तरी पावलं वाजतांच राजा घाईनंच आपल्या खोलींत आला.

"कोण राजाभाऊ वाटतं ?..." स्वतःच्या खोलीकडे जात असलेल्या गांजवे मास्तरांचे शद्ब ते ! कांहींच प्रत्युत्तर न करतां राजानं आपल्या खोलीचं दार बंद केलं. लीलावतीच्या खोलींत एवढ्या रात्रीं जातांना गांजवे मास्तरांनीं पाहिलं तर ! त्यांच्या शद्बांतली भेदक धार त्याला असह्य झाली ! गांजवे आपल्याला आतां जवळ देखील उभं राहूं देणार नाहींत असं वाटतांच त्याला अतिशय वाईट वाटलं. पण लीलावतीवर आपण केवढा कलंक आणला, ही कल्पना तर त्याच्या मनाला आत्यंतिक वेदना करूं लागली.

एवढ्यावरहि लीलावती त्याच्या खोलींत येऊन म्हणालीच होती—

"राजाभाऊ ! दुसऱ्यांना जिंकण्याची हाव धरणारीं माणसं अशीं हतबुद्ध होत नसतात कुठं ! माझ्या हृद्याची अद्याप तुम्हाला ओळखच नाहीं ! काल अकस्मित भलत्याच वेळीं तुम्हीं आलां काय ? अन् लगेच परत फिरलां तरी काय ? इतकं मी तुमच्याशीं मोकळेपणानं वागूनही शेवटीं चोरी करण्याची इच्छा तुम्हाला कां व्हावी ! स्वतःचा मनस्ताप मात्र वाढवून बसलांत ! अन् माझ्या नांवानं पुनः चाळींत काहूर उठवायला आगत केलीत ! पण माझ्यापेक्षां तुम्हालाच टीकेची अधिक भीति वाटते ! माझं भिऊन कसं चालेल ! मला जगायचं आहे ! मनाच्या सूचना कान देऊन ऐकायच्या आहेत मला ! मजवर लादलेल्या बंधनांतून बाहेर पडण्यासाठीं धडपडते आहे मी ! तुम्हाला वाटत नाहीं, माझं तुमच्यावर प्रेम आहे, असं ! मग तुम्ही तरी माझ्याशीं प्रतारणा कां करतां ?..."

लगेच तिनं आपले निराधार हात अत्यंत विश्वासानं राजाच्या स्कंधावर टेकले होते. आपली स्नेहाकूल दृष्टि त्याच्या दृष्टीला मिळवली होती. अन् आपल्या मुळवून पुढें केलेल्या तप्त, अतृप्त ओठावरला सोत्कंठ भाव न बोलतांच टिपला जाण्याची ती वाट पहात होती...

* * * *

जवळ आलेली परीक्षा एकदाची संपली! आतां राजाला गांवीं जायचं होतं! या चाळींत रहावंसं वाटेल असं काय राहिलं होतं? लीलावतीच्या आणि त्याच्या संबंधाबद्दल चाळींत खूप गाजावाजा झाला होता! बहिष्कृतासारखंच त्या दोघांना वागविण्यांत आलं होतं! कसलंहि प्रायश्चित नसलेलं एखादं भयंकर पापच जणु त्यांनीं केलं होतं! जोगळेकरांनीं हितचिंतक नांवाखालीं लीलावतीच्या नवऱ्याला तिच्या वर्तनाची हकीगत निवेदन करणारीं पत्रंही लिहावयास कमी केलं नव्हतं! हे सडके भाग कापून टाकले पाहिजेत, अशी त्यांची नेहरूथाटाची गर्जना नेहमीं चालत होती...अन् अखेर लीलावतीला परगांवीं जावं लागलं होतं. राजाच्या तरुण अंतःकरणाला धडकी भरवीतच अवतरलेलं तें उन्मत्त स्वप्न मोठं चमत्कारीक वेड लावून नाहींसं झालं होतं! आपण आपल्या दुर्बलतेनं लीलावतीला अंतरलों, हें मनांत आलं कीं राजाला स्वतःचा अतोनात राग येत होता. अन् त्याच्या मनाला लागून राहिलेली दुसरी गोष्ट म्हणजे तो गांजवे मास्तरच्या मनांतून उतरला होता! लीलावतीच्या खोलींत ओढून नेणारी ती रात्र उगवलीच नसती तर? पण केवळ तो तिच्या खोलींत जाऊन आला म्हणून गांजवेनीं राजाला शीलभ्रष्ट लेखावं?...गांजवे सारखं ध्येयवादी जीवन अनुभवण्याची तीव्र इच्छा त्याच्या मनांत केव्हांपासून स्थान करून होती. अन् काल परवां एका सार्वजनिक सभेंत झालेल्या त्यांच्या व्याख्यानांतलीं कांहीं वाक्यं तर राजाला अजूनही आठवत होतीं...

"—दिवसेंदिवस प्रगतीचा एकेक टप्पा गांठीत जग पुढं पुढं चाललं आहे! फार पूर्वीच्या रानटी मानवांत व चालू शतकाच्या ज्ञानाच्या अनंत शाखांतून विहार करणाऱ्या मानवांत केवढं अंतर आहे! जग अपुर्णतेंतून पूर्णतेकडं झुकतं आहे. अन् या जगाला पूर्णतेची दिशा दाखविणारे मानवोत्तम..."

स्वतः गांजवे अशाच मानवोत्तमापैकीं एक नव्हते काय?... पण त्यांच्या त्यागमय जीवनाविषयीं बोलतांना तर लीलावती म्हणाली होती "त्याग करण्यासारखं त्यांच्याजवळ आहेच काय? दारिद्र्यांत उंच उंच ध्येयवादाच्या बाता झोकणं म्हणजे हाताचा मळ असतो नुसता! मधाचं भांडं जोंवर दूर आहे तोंवरच मला एकही गोष्ट मोह घालीत, असं म्हणण्यांत स्वारस्य! अतृप्त

आणि भुकेलं राहण्यालाच त्याग म्हणायचं असेल तर रस्त्यावरचे भिकारी देखील कांहीं कमी त्यागी नाहींत!"

हे राजाला पटलं नाहीं तरी प्रणय आणि ध्येय या दोहोंचींही प्रतीकं आतां त्याच्या कक्षेतून दूर गेलीं होतीं. एकाला तो मुकला होता. अन् दुसरं आतां साध्य होणं शक्य नव्हतं! परीक्षेत आपण पास होऊं किंवा नाहीं, याची त्याला पर्वा वाटत नव्हती! आज फक्त त्याला गांवीं जायचं होतं! खिशांत पंधरा-वीस रुपये होते! अन् ते कसे खर्च करावेत याचा तो विचार करीत होता!

अशाच विचारांत तो गॅलरीतून खालच्या चौकांत पाहूं लागला. खालीं नळावर खालच्या बिऱ्हाडांतली एक तरुण मुलगी धूत होती. तिच्याच वयाची तिची एक जोडीदारीण तिथं आली. पहिली दुसरीला कांहीं तरी म्हणाली, अन् मग दोघीहि खूप हंसल्या. दोघीही रूपानं अगदीं संपन्न होत्या! राजानं क्षणभर त्यांच्याकडं रोखून पाहिलं! लगेच त्याच्या मनांत काय आलं कुणास ठाऊक! त्यानं पोशाख केला अन् तो घराच्या बाहेर पडला. बाजारांत आल्या-वर प्रत्येक दुकानाची त्यानं नीट पाहणी केली! पण त्याला हवासा वाटणारा एकही पदार्थ त्या दुकानांतून आढळला नाही.

मग एका फोटोग्राफरच्या दुकानांत तो शिरला. जिकडं तिकडं विविध रंगाची विविध प्रकारचीं चित्रंच चित्रं त्याला दिसूं लागलीं. कांहीं इंग्रजी कॅलेंडर्स, कांहीं 'कोडॅक'चे शॉटस्, कांहीं वेशभूषेचे नमुने, मध्येंच रवि-वर्म्याची एखादी उर्वशी तर तिलाच टेकून पॅरीसचं एखादं अर्धनग्न सौंदर्य, अशीं दृष्टीचीं विविध आकर्षणं भिंतीला लटकत होतीं. भिंतीची सारी चित्रं पाहून राजा समोरच्या शो-केसकडं वळला. कोणी तरी हौसी तरुण दुकान-दाराकडे नग्न चित्रांचा अल्बम मागत होता. अन् तो हातीं आल्यावर त्यांतलं प्रत्येक चित्र मोठ्या औत्सुक्यानं पहात होता. ती चित्रं पहाण्याचा राजालाही मोह अनावर झाला. कांहीं तरी त्याच्या मनांत आज खुपत होतं. अन् अशा खुपऱ्या मनाचं समाधान कसं करून घ्यावं, याचा राहून राहून त्याच्या मनांत विचार येत होता. तोंच नग्नचित्रं पहातांना आपण पकडलों गेलों आहों अशी शंका त्याला आली. कारण दुकानदार मोठ्या भिष्किलपणानं त्याच्याकडं पाहून

हंसला. दुकानांतून बाहेर आल्यावर राजानं सबंध बाजार पुनः एकदां पालथा घातला. एका पानवाल्याच्या दुकानासमोर एक ख्रिश्चन जोडपं उभं होतं. विकच्छ नेसणांतलं ते ख्रिश्चन लावण्य राजाला त्यावेळीं मोठं आकर्षक वाटलं. दुकानासमोर त्यालाही क्षणभर थांबण्याची लहर आली. दुकान सिनेमानटीं-च्या फोटोनीं गजबजून गेलं होतं. पान खातांना सुंदर चेहरे दृष्टीस पडावेत असा दुकानदाराचा हेतू असल्यास नकळे! राजा तेथून निघाला. आतां कोणता भाग पायाखालीं घालायचा, याचा विचार त्याच्या मनांत आला. पुढच्या दुकानांत रेकॉर्ड लागली होती—

"बाई शेज फुलांची केली ऽ—" भिकार हॉटेल असावं तें! सिनेमाला जावंसं राजाला वाटलं. तोंच त्याचा बेत बदलला. अन् मग त्याच्या चाळीच्या मागच्या गल्लींत त्याचे पाय वळले. संध्याकाळ होऊन रस्त्यावरचे दिवे लागले होते. राजा आणखी किती वेळ भटकत राहणार होता कोण जाणे! त्या गल्लीच्या पहिल्याच घरापुढं लोकांची खूप गर्दी झालेली त्याला दिसली. वरच्या माडींत दिव्याचा झगझगाट होता. संगीताच्या साथीवर नृत्य चाललं होतं. अन् तेथल्या वातावरणाच्या मस्तीनं बेहोष झालेल्या श्रोत्यांचा हास्य विनोदही ऐकूं येत होता. खिशांतले पैसे राजाला ओरडून सांगत होते— "पुरे कर आमचा बंदिवास आतां! वर मैफिल पहा कशी रंगांत आली आहे ती! काय म्हणावं तुला!..."

वरच्या गर्दीत जाऊन बसण्याची राजाला लाज वाटली. एकदोन घरं ओलां-डून तो नेमका जानीच्या घरापुढं आला. अन् थोडंसं बाजूला उभा राहून इकडं तिकडं पाहूं लागला. त्याच्या मनांत निवडीचा कांहींच प्रश्न नव्हता. खिशातले पैसे कुठंतरी अन् कसेतरी खर्च करायचे होते! मधूनमधून त्याच्या कानांत कुणी तरी सांगत होतं--आपल्याला जगायचं आहे! मनाच्या सूचना कान देऊन ऐकायच्या आहेत!

आतांपर्यंत अडखळलेल्या त्याच्या पायांत कसल्या तरी विलक्षण शक्तीचा संचार झाला. घाईनंच तो जानीच्या दारापुढं आला अन् जिन्याच्या पायऱ्या चढणार इतक्यांत वरून येणाऱ्या व्यक्तीचा त्याला धक्का बसला. त्या धक्या-

बरोबर आश्चर्यांचे जे कैक धक्के त्याच्या मनाला बसले ते मोठे विलक्षण आणि जोरकस होते ! वरून आलेली व्यक्ति म्हणजे राजाचे परमप्रिय गांजवे मास्तर ! परवांच्या व्याख्यानाच्या वेळचाच त्यांचा आतां पोशाख होता. त्या क्षणांत राजानं त्यांचा चेहरा आणि वेश नीट न्याहाळून पाहिला. मास्तरना लाज वाटली, आश्चर्य वाटलं कीं आणखी कांहीं वाटलं हें राजाला समजलं नाहीं. त्यांना हांक मारून थांबवावं असंहि त्याच्या मनांत आलं. तो नाद सोडून त्यांच्या घाईनंच जाणाऱ्या आकृतीचा तो पाठलाग करूं लागला... विचारांची त्याच्या मनांत नुसती गर्दी झाली होती. लीलावती, तिच्या सहवासांत घाल-विलेले दिवस... त्या काळांतलीं कैक चित्रें त्याला दिसत होतीं. अन् मग त्याची मनोव्यथा अधिकच वाढत होती ! ' माझं तुमच्यावर प्रेम आहे ' असं निःसंकोचपणानं सांगून लीलावतीनं आपले आतुर ओठ पुढं केले होते. अन् लोकापवादाच्या भीतीनं त्या मुग्धेचं मनोगत राजाला स्विकारतां आलं नव्हतं ! हरिभाऊ जोगळेकर नैतिक आचारावर घसा ताणून बोलत होते, अन् त्यांच्या घरांत मर्जीविरुद्ध कोंडलेली त्यांची तरुण पत्नी निश्वास सोडीत बसली होती. आदर्श चारित्र्याचा देखावा निर्माण करणाऱ्या गांजवे मास्तरांनीं राजाला शीलभ्रष्ट ठरवलं होतं, अन् राजानं त्यांना वेश्येची माडी उतरतांना पाहिलं होतं... आपण कुठं आलों होतों अन् आतां कुठं चाललों आहों, हें राजाला समजलं नाहीं. लीलावती कुठं गेली, उच्चसंस्कृति जाहीर करणारा पोशाख करून गांजवे मास्तर कुठं चालले होते, अन् ज्या जगाच्या प्रगतीबद्दल गांजवे मास्तर मोठ्या आवेशानं बोलले होते तें त्यांचं मिथ्याचाराच्या अनंत आवर-णांत लपेटलेलं जगही कुठं चाललं आहे, हें तरी राजाला कसं समजणार ?...

---

[ ' वीणाप्रकाशन ' तर्फे प्रसिद्ध झालेल्या ' साकी '— या वैशिष्ठ्यपूर्ण संग्रहातून ]

---



इन्डस्ट्रीयल ( हत्तीछाप )

# मलेरिया मिक्श्चर.

मलेरिया तापाकरितां शेवटचा शोध

हा रोग हाली सर्वत्र पसरलेला आहे. वेळी योग्य उपचारा-करितां खरे औषध मिळत नसल्यामुळें प्रतिवर्षी लाखो मनुष्य ह्या राक्षसी रोगाच्या बळी पडतात हे उघडच आहे

हिव लागून पाळीनें येणारा ताप ( मलेरिया ) शितज्वर, जीर्णज्वर, हाडीज्वर, पानथरी व यकृत वाढल्या-मुळें उद्भवलेला पित्तज्वर व कफज्वर कहर्का वगैरे नवा किंवा जुना कोण-त्याही प्रकारचा ताप असो ह्या दिव्य औषधाचे २ किंवा ३ खुराक घेतांच स्वेद ( घाम ) येऊन ताप ताबडतोब उतरतो शौचास साफ होऊन डोक्याचे दुःख कमी होतें दुसरी औषधें पुष्कळ




दिवस घ्यावी लागतात तोपर्यंत रोगी कृश होतो पण ह्या औष-धानें रोग ताबडतोब नाहींसा होतो म्हणून रोग्याची शक्ती कायम राहते.

युकास्प्रीन टॅब्लटेस— घेतल्यानें डोके दुखणें एकदम थांबते ह्याशिवाय सर्दी, पडसे, अंग दुखणें, सुस्ती वगैरे विकार कमी होतात किंमत १ आणा.

पत्ताः– सत्तार मेडिकल हॉल परभणी, नांदेड, औरंगाबाद.